# पहिला बळी

( संपूर्ण तीन अंकी नाटक )

लेखक

अमर शेख

अभिनव प्रकाशन, मुंबई १४.

किंमत एक रुपया

# अर्पण

प्रिय कॉम्रेड डी., कामगारवर्गीय चळवळींतल्या
तुमच्या—महान् तपश्चर्येला ही
अल्पकृती सादर करीत
आहें. तुम्ही स्वीकार
कराल ना ?

# सुरवातीआधीं

—आणि शेवटीं जनामावशीला स्वतःचा पहिला बळी द्यावा लागला. जनामावशी—महाराष्ट्रानंच तिला जन्म दिला. ती तेजस्वी जनामावशी.

आजही महाराष्ट्र या जनामावशीला आपल्या विशाल उदरांत अभिमानानं जन्माला घालीत आहे. पोशीत आहे, वाढवीत आहे. शहरात-खेड्यांत; रस्त्यात-बाधावर, मैदानात, दऱ्या कपारीत; गिरण्या कारखान्यांत-रानावनात या तेजस्वी जनाईचं दर्शन आजच्या महाराष्ट्रीय जनतेला होत आहे. त्यातलीच ही माझी जनामावशी एक आहे.

पहा अंवती भंवती. अंगापिंडानं खंगली, थकलीभागली, तरी पेटता ज्वालामुखी भासेल उभा तिथं. तिची दृष्टी पडेल तर कळिकाळाला थरकांप सुटेल. ती गर्जू लागली तर मी मी म्हणणारे तिच्या सुटणाऱ्या शब्दाबरोबर वाऱ्यावरच्या म्हातारीगत उडून होते की नव्हतेसे होतील. पहा सभोवती.

ती थोर जनामावशी आज जमिनीसाठीं कठशोष करीत आहे जिवाहून प्यार तिची जमीन नासून उध्वस्त व्हायला लागली आहे आज. शेतीच्या धद्यांत येणाऱ्या नव्या भाडवलशाहीनं रोज नवनव्या प्रकारच्या पिळणुकीच्याच मार्गांचा अवलंब करून, जुन्यानव्या गांवगुंडीचा आडोसा घेऊन या जनामावशीवर प्राणघातक हल्ले करून, तिला जेरीस आणलें आहे; दे माय धरणीठाय करून सोडलें आहे. साखरेची लेणीं करून ज्या कारखान्यानें जनामावशीच्या अंगावर घालावीं तिलाच ही कारखानदारी घेऊन सडवून कुजवून दिवसा ढवळ्या मारायला निघाली आहे; तिचं पाठीराख सरकार मोठ्या इमानानं, तिच्या विषारी अपेक्षा आपल्या धोरणानं, कृतीनं व दंडुक्यानं साकार करूं इच्छित आहे आज !

पण ही थोर जनामावशी जगाच्या आरंभापासूनच या जुलुमाचा, अन्यायाचा, दंडेलीचा प्रतिकार करीत आलेली आहे. तशीच आजही पण नवीं रूपें; नवीं आश्रयस्थानें; नवीं हत्यारें घेऊन नव्या जोमानें, नव्या निश्चयानें प्रतिकाराच्या आखाड्यांत उभी असलेली तुमच्या माझ्या दृष्टीला पडत आहे आज.

ही वस्तुस्थिती–हा इतिहास–त्यांतलं फक्त एक पान ही माझी जनामावशी न् तिनं केलेलं स्वतःचं बलिदान.

## पहिल्या अंकांतील पात्रें

**वेळ : पहांटे तीन साडेतीन व सकाळचे सात-आठ**

**जना मावशी**— वयस्क शेतकरीण, चंदाची आई.

**म्हाई**— तरुण शेतकरीण, चंदाची बायको.

**अबदुल**— एक शेतमजूर.

**सुभाना**— चंदाचा दोस्त, मावशीच्या विश्वासांतला एक तरुण शेतकरी.

**धर्मा**— तरुण असा गरीब शेतकरी. चंदाचा दोस्त.

**सखाराम कुलकर्णी**—साखर कारखानदाराचा हस्तक, गांवचा कुलकर्णी. तरुण.

**धोंड्या**— शेतमजूर, सखारामाचा हस्तक.

**गेना**—महार.

**जमन साहेब**—गुजराथी प्रौढ माणूस, साखर कारखान्याचा ओव्हरसीयर, आणि इतर कांहीं शेतकरी.

# पहिला बळी

## अंक पहिला

[ जना मावशीचें म्हणजे सुखी शेतकरणीचें घर. एक भला मोठा वाडा, घरासमोरच्या जोत्यावर जना मावशी आपली सून म्हाईबाई हिचे शेजारीं निजलेली आहे. उशाला पाण्याचा भरला तांब्या असून उशालगत असलेलें दार लावलेलें आहे. रात्रीचा तीन साडेतीनचा सुमार, वाड्याच्या मागच्या बाजूनें ( डाव्या-बाजूच्या वींगनें ) तीन बुरखाधारी माणसें हातातील बॅटरीचा उजेड पाडीत हळूं हळूं चांचपडत जोत्याच्या बाजूनें येतात. आवाज होऊ नये म्हणून खबरदारी घेत घेत पुढें सरकून दोघे जोत्यावर चढतात. त्यांना एक जनामावशी व म्हाईवरती बॅटरीच्या प्रकाशाचा झोत पडतो, व तोच हळूच दार उघडणार तोंच आवाज होतो मावशीला जाग येते. " कोन हायरं मेल्या " म्हणत मावशी भरला तांब्या उचलते. तिघेही निसटायूला लागणार तो मावशी "आरं आबा, सुभाना, हे मेले आले रं ऽ आरं आबा, सुभाना, हे मेले आले रयऽ " म्हणत त्यांच्या बाजूनें तांब्या भिरकावते. म्हाई उठते. मावशी म्हाईला दिवा लावायला सांगते. म्हाई दिवा लावीत असताच मावशीनं उशाचा कोयता घेऊन शेवटच्या पळणाऱ्यावर वार केलेला असतो तो पुन मावशीकडे झेप घेणार तो आबदुल आलेला पहा ाच पळतो. एवढ्यात आधीं भिंतीवर चढून गेलेले चोरटे जनामावशी, आबदुल, म्हाई यांच्या दिशेनं दगड फेकूं लागतात. अबदुल मावशीला " आडुसा घ्या मावशी," असें सांगतो, आणि मावशी, आबदुल म्हाई भिंतीच्या दिशेनें दगड भिरकवतात मावशी मधून मधून 'सुभाना, धर्मा, अरे यारे' 'सुभाना, अरे यारे ' अशी आरोळी ठोकीतच असते. बाहेरून उजव्या वींगनें आवाज येऊं लागतात " अबदुलभाई, मावशी, दार उघडा " असा गलका वाढत जाऊन, धर्मा उजव्या बाजूच्या वींगनें भिंतीवरून येऊन दार उघडतो. लोकही पण धांवत मावशीकडे येतात. कुणी हातांत काठ्या आणलेल्या असतात. कुणी दगड, कदीळ आणतात. लोक विचारतात, "कोण मावशी ? कुठंय मावशी ?" जना मावशी 'हिकडं बाजूला ' म्हणून डाव्या वींगकडे बोट दाखवते; आबदुल 'चला' म्हणून लोकांच्या पुढें निघतो सुभाना अगरेना वाड्याच्या दारावाटे जाऊन मागच्या भिंतीकडे यायला सांगून तो स्वतः डाव्या वींगकडे जातो जना मावशी घरांत नीटनेटकें आहे कीं नाहीं तें पाहून येते. लोकही चोंहोंकडून चौकसून परत येतात. ]

**सुभाना :** अबदुलभाई, आरं दार तरी उघडायचं न्हाई चर्दिशी ? धर्माला म्हाळशावर चढून यावं लागलं वाड्यांत. मावशी ! लागलं बिगलं काई ?

**जनामावशी :** हं ! बायले मेले, मेंढरं होती निस्तीं; न्हाई, बगू बरं बाळ कुठं लागलंय तुला ?

**न्हाई :** न्हाई, न्हाई, मला न्हाई कुठं लागलं, खरचटलंय् निसतं हाताला.

**जना :** बरं, आन जा बरं घरातून आंबेहाळदी, रक्त्याबोळ. आबा, बगु बरं बाळ तुला कुटं लागलंय् ?

**अबदुल :** न्हाई मला न्हाई लागलं तसं काई.

**सुभाना :** पन मावशी, तुमचं बगा कीं आदी. ही बगा बरं, ह्या अंगानं रगत याया लागलय कानाच्या बाजूनं.

**जनामावशी :** व्हय ? (डोक्याचें रक्त हाताला लागलेलें पाहून) हंः वाघिनी-झुंझ खेळाया येत्यात मेले. बगा तर खरं. खडबड खडबड वाजलं, जाग आली, चोरट्याचा वास लपतोय व्हय ? दिला उशाचा भरला ताब्या भिरकून, बसला असल पेकाटात, न्हाईतर टाळक्यात, 'आग आयुंव' मनताय मेला, त्येची गार भरली. अन् लगी उठनार येवढ्यात उशी जवळून येक पळाला. काढलाच हातु-रनाखालचा इळा, पन तंवर कुठला ठरायला मेला. जराशात निसटला. जाऊ दे. ( न्हाई आंबे हाळदी, रक्त्या बोळ, पाण्याचा तांब्या आणते. ) आण बया, सान आन् कीं. ( न्हाई सहाण आणायला जाते. )

**सुभाना :** मंजी थोडक्यांत बचलं मनायचं.

**जनामावशी :** मंजी ?

**सुभाना :** मंजी देवीचं दयेनं जिवाला धक्का लागला न्हाईवं.

**जनामावशी :** जिवाला धक्का ! जनाच्या ? निसते पाय वळिवले असते तर डेंडाळं काढून आडकिवलं असतं तिच्या इळ्यानं त्याच्या गळ्यात् ( न्हाई सहाण घेऊन येते. सहाणेवर आंबेहळद उगाळून तिघांच्या जखमांवरतीं लावली जात असतांना थोडा थोडा गावकऱ्यांचा गलकाही चालू असतो त्यांतच—

**एक शेतकरी :** पन् मावशी किती जन असल्याल बरं ?

**जनामावशी :** तिवं चौघं असल्याल की. न्हाईरं आबा ?

**अबदुल** : हं.

**दु. शेतकरी** : कुनिकडच्या बाजूनं आलं आसत्याल बरं ?

**जनामावशी** : गेले तर खरं मेले ह्या बाजूनं—भितीवरनं; हातांत बॅटऱ्याबि होत्या मेल्यांच्या; सख्या बामनाचा आला न्हाइ कारं ?

**सुभाना** : त्यो कशाला येतोय आतांच, येइल गांवकऱ्यांच्या जिवाचं तीन तेरान् घरादाराची राखरांगोळी झाल्यावर. येइल सरकार सवारी उद्या न्हाइतर परवा चौकशीचं सोंग घेऊन.

**धोंड्या** : ( पायरीवरूनच ) उचलली जीभ लावली टाळयाला ! सरकारी काम हाय राव, आता न्हाइ आलं तरी दिवस निगाला रं निघाला कि ठेवल्यात हितं. सरकारी काम मंजी थट्टा हाय व्हय ?

**धर्मा** : ( उपरोधीकपणें ) खरंय. येयाल बाबा !

**धोंड्या** : व्हय तर, ह्यांचा पुरा माग काढून पिट्टा पाडल्याबगर न्हायचेच न्हाइत रावसायबन्.

**सुभाना** : हं ! घराचा घरधनी चंदा गेलाय, मन चाललेत सगळे चोचले.

**धोंड्या** : ( थोडं कुऱ्यांत ) काय मनताव ?

**धर्मा** : मंजी चोराठोरांच रं. लै मातलेत अलिकडं, जरा बगितलंच फाइजी गांवकऱ्यांनीं त्यांच्याकडं. न्हाई ? रावसाब तर हैंतच आपलं.

**धोंड्या** : ( अवसानानं ) अवं हैत मंजी काय धाकल्या धन्यांच्या ठिकानी हैत जनामावशीला. एका लंगूटीनं वाडल्यान न्हवं धाकलं धनी न् रावसाब. अन् त्यांत पुना सरकारी काम. हं ! जनामावशी झोंपा तुमी समदें. लै तरास झाला असंल तुमास्नी. चलारं चला, झोपूया त्येंस्नी आता.

( लोकही जायला लागतात व धोंड्याही जातो. )

**जनामावशी** : आबा, आनि कुटं लागलंय कारे बाबा ?

**अबदुल** : न्हाई मावशी, भाबीकडंच बगा जरा, अन् तुमचं कसं हाय ? आनी कुटं लागलंय ?

**जनामावशी** : मला काय आलीय् थकनी ? ही आनां बसते दळाया. चल न्हाई थकली आसशील तूं. पड जा. मी बसते जात्यावर.

**न्हाई** : मी बी लावते की हात. ( दळण आणायला आंत जाते. )

**जनामावशी** · सुभाना, धर्मा आबाबर जरा वाड्याच्या भंवताली बगुन या बरं, अन् आजचा दिवस हितंच आबाबर ऱ्हा. आबा तुम्ही तिघं सोप्यात झोपा. जा बरं आमी बसतो जात्यावर. निगलंच आता सुक. ( आबदुल, सुभाना, धर्मा कंदील काठ्या घेऊन जातात, जनामावशी जात्यावर बसून ओव्या म्हणते. ऱ्हाई तिला दळायला साथ देते. जातें कोपऱ्यांतच ( तिथेच ) असतें. )

( ओव्या–चाल : रक्तानं ग रंगलेला. )

**सपनामंदि आला माझा चंदा लाडका ॥**
**रंग गऱ्हाचा गं बाई–आभाळी रंगाची साई**
**सप्नि शामरुईचा राज –चंदा लाडका ॥**
**उभा जसा डोंगर बाई–वरति चंदनाची राई**
**जगा वास देई माझा–चंदा लाडका ॥**
**जुलुम आणि अन्यायाला झोडुनि गं काडायाला**
**तरना बांड नाईक सजला–चंदा लाडका ॥**
**फोडिलि डर्काळी त्यानं–हादरुनिया समदं रानं**
**धडकि दुस्मनाला सपनी–चंदा लाडका ॥**
**बंड चा उडाला भडका–रक्तानं सारिवल्या सडका**
**आघाडिला देई धडका–चंदा लाडका ॥**

( दळण संपतें. तें संपतांच दिवस उजाडतो. मावशी चहा घेतां घेतां अबदुलला बोलावते. )

**जनामावशी** : आबा अरे आबा ! उठला कां ? उठीव समद्यास्नी. चा घ्या मनावं, धुवा तोंड हातपाय. चला. ( मावशी चहा घेत असतांना आबदुल, सुभाना, धर्मा तोंड धुवून येतात. ऱ्हाई त्यांना बसायसाठीं चवाळें टाकते. ते सारे चहा घ्यायला लागणार तों जनामावशी कासोटा मारून खांद्यावर हासूड व हातांत कासरा घेऊन पायांत चपला घालते व आबदुलला उद्देशून म्हणते. ) आबा, मी गाडी जुपून शेतावर जाते तूबी ये चा पिऊन, वैरनकाडी करून घरातलं काम आटपून, तंवर घेते कुणाला तरी हाताखाली, अं ? जाते मी. ( जाते. )

( ऱ्हाई तिघांना चहा देऊन कामानिमित्त घरांत जाते. )

**सुभाना** : ( चहा घेतां घेतां ) झोपला बिपला होता कां न्हाई अबा ?

**अबदुल** : हंः कसली येतीय पाटीर झोप ? एक एक होतंय ते इचितरच. ( थोडा विचार करून ) पर काय वं पाटील, कुनाची हिंमत आसल व ही मावशीच्या घरापतुर हात लांब करायची ?

**सुभाना** : खरं सांगू ? ( हळूच ) हंः आरं दुसरा कोन आसनार ? त्योच आसनार कळीचा नारद सख्या ह्यातला मुखंड.

**अबदुल** : ( एकदम आश्चर्यानं ) ऑऽऽ मंजी त्यो-त्यो आसंल मनता ह्यांत ?

**सुभाना** : येडा रं येडा, आरं ही आंतल्या गाठीची मानसं, लै बनलेली असत्यात. तोंडावरचं रगत पुसलं गेल न्हाई तर त्येचावर समदं लोनी चोपडत्याल अन् वरती ऐटीनं मिरिवत्याल. मग छाती हाय तुझी रक्ताचा रंग पाढराच असतो मन मनायची ?

**अबदुल** : आवं, पन हे लोनी तरी मिळाया व्होवं न्हाई ? गावकऱ्यांच्या म्हशी काइ इतक्या उंडारल्या न्हाईती.

**सुभाना** : आरं पन आबा, गावातल्या काई म्हशी उनाडल्यातच की. अन् न्हाईतरी आता गावठी लोनीच कशाला फाईजी ? साखरकारखानदाराचं पॅकबंद डबं, त्याला रं काय तोटा ? अं ?

**अबदुल** : मन काय जनामावशीच्या घरावर हात टाकील त्यो ?

**धर्मा** : आरं तसाच हाय त्यो डोमकावळा. आत एक अन् भाईर एक.

**अबदुल** : आरं व्हय. पन मावशीच्या घराम्होरं का मन लागंल त्याची गावगुंडी ?

**धर्मा** : त्याचं आसं हाय आबा, चंदा असा चळवळया, ह्या डोमकावळ्याची समदी पापं त्यो इशीवर टांगतो. अं ? अन् बामन हाय साखळकराचा— कारखानदाराचा दलाल. पाटागत चंदाची जमीन फुकटात घशात घालाया मिळत न्हाई, दलाली बी चालत न्हाई न् कुलकरपनांच पांग बि फिटत न्हाई मन चंदाला झेलात घातल. आता मावशीला एकटी बगून गावगुंडीनं भाजून काडायचं. वाटतला काटा चंदा दूर केला, आता नाडुन पाडुन गांवगुंडीन सतवून मावशीला हैरान करायचं न मग...हं असंच असनार.. पर इतक्या खोलात त्यो हात घालील असं मला बि न्हाई वाटत बाबा. कुनि कसाबि आसला न् मावशीकडं बगायच मनल तरी त्याला सात जिल्या वागनीच्या दुधाचं इंजाक्शान घेऊन यावं लागंल.

**अबदुल** : काई मना, ह्या धाडीएकी धर्मादादाबानिच माझाबि इस्वास बसत न्हाई. अवं, ह्या वाड्यापतुर येनाऱ्या मानमाचं काळीज एवळच असलं फाईजी राव. ( न्हाई चण्याची दाळ दळायला येते. त्या आधीं त्यांतले खडे निवडीत असते. सुभाना विडी शिलगावतो. )

**न्हाई** : ( येतायेतांच ) पन खरंच भावजी, काय आसंल व ही रातीचं ?

**सुभाना** : काय हाय ती ठावं हाय आमाला. तुमाला कशाला त्याची फिकीर ? आमि कशाला हावंत ?

**अबदुल** : तसं आमि हावंतच कीं. पन काय वो, रावसाब तर मावशी-एकी जीव टाकतो अक्षी.

**सुभाना** : गोडबोल्या !

**न्हाई** : पन मैतरबि हैतं न्हवं जिवाभावाचं धाकटंपनीचं त्यांनं.

**सुभाना** : हंः मैतर ! धन्यापुडं गोंडा घोळणारं कुलगं कुत्रं, त्याला मैतर-पनाचं काय !

**अबदुल** : होईल व समदं बराबर......(न्हाईकडं बघून ) पन चंदा दादा झेलातून कधीं येईल बरं पाटील ? काय भाबी ?

**न्हाई** : ( लाजून ) आबदुलाभाई, तुमि आपलं......काय वं असं ?

**अबदुल** : ( गंभीरपणाचा आव आणून थट्टेतच ) भाबी, तुमच्यासाठीं न्हाई मनलं. आमाला बि तान हाय मनलं चंदा दादाची. काय पाटील ?

**धर्मा** : हं येईल येईल, जलम भर काय तुरुंगांतच ठेवत्याल काय त्याला ? हां हां मनता जात्याल हे दिवस. सुटल लवकरच त्यो.

**सुभाना** : अन् भाबीची काय तशा डगमगनार हैतं ? सुन कुनाची हाय ती ? अं ?

**धर्मा** : अन् चंदा दादा तरी काय कमी हाय ? सारा गाव त्येच्यासाठीं जिवावर उदार होईल. ( सुभानास ) सुभानदादा येतोस का ? मला जरा जनावरास्नी वैरन काडी करायला फाईजी

**सुभाना** : व्हय् व्हय् बाबा, मलाबि निघायलाच फाईजी. ( जातात. आबदुलभाई, चारा पाणी करायला निघणार तोंच त्याला न्हाई, " आबदुल-भाई, थोडी लाकडं फोडून फाईजीत बरं का ! " असें सांगून ती हातांतली डाळ दळण्यासाठीं जात्यावर बसते. आबदुल लांकडे फोडायला घेतो न्हाई जात्यावर ओव्या म्हणते. )

-ओव्या-

जगाच्या आभाळांत--फुले ग पहाट
माझ्या हिरद्यात-आगडोंब ॥
शीतळ पहाट-गाई शुभ गीत
माझ्या हिरद्यात-घुघ्घु गाई ॥
झरा गातो गाई झुळूझुळू गानं
दैवाचं हे गानं-ऐका बाई ॥
बोलते ग मैना-गातो गं कोयळ
सोनेरी दऊट-सुन माझे ॥
सुकले कमळ कोरड्या तळयात
बाळ पाळण्यांत-रडे बाई ॥
काळा तुझी इच्छा होऊं दे सफळ
कोनचे बी फळ-दई आतां ॥
माझा एकटीच होवो कांहीं होवो
सुखी जग राहो माझ्या मागं ॥

( आबदुल अंगणांत गाण्याच्या तालावर लांकडे फोडीत असतो. चाहूल न लागूं देतां सखाराम कुलकर्णी हातांत केसरीचा अंक घेऊन आंत येतो व तोही अधाशीपणानें गाणें ऐकायसाठीं कान टवकारून उभा असतो. गाणें संपतांच तो हळू हळू न्हाईला पहाण्यासाठीं पडवीकडे डोकावून पुढें सरकणार तोंच आबदुल ' कोन हाय ' म्हणून विचारतो. सखाराम प्रथम दचकतो, नंतर सावरतो. )

**सखाराम** : काय आबदुलभाई, मावशी घरांत आहेत ना ?

**अबदुल** : न्हाई, त्या शेतावर गेल्याती. ( न्हाई घरात जाऊन आड होते. )

**सखाराम** : मला वाटलं मावशीच जात्यावर बसली आहे. पण कायरे आबदुल, तूं कपडे शिवायला न्यायसाठीं येणार होतास ना ?

**अबदुल** : रावसाहेब ! तुमी बगतायच आता, सुगीचं पीक उभं राह्यलंय. घरांत गडी मानूस न्हाई मावशीच्या, अन् चंदा दादा तिकडं झेलात. तसंच माझाबि जरा...तोंडचा घास......

**सखाराम** : अन् आमचा वनवास– तो नाहीं तुला दिसायचा. कापड आणून टाकल्यापासून बबीनं रोज डोकं उठिवलंय. हिला काहीं पोलकी शिवायची आहेत. येतो म्हणून सांगितलंस अन् मुद्दाम बहाणा कराय लागलास नाहीं का ? लक्षांत ठेव तूं म्हणजे झालं. अरे, होत नसेल तर साग सरळ तसं होत नाहीं म्हणून.

**अबदुल** : पन रावसाब, आजवर कधीं चुकारपना केलाय कां तुमच्या कामांत ?

**सखाराम** : हं खरंय. आपली मेहनत पैशानीच मोजणार बाबा तुम्हीं लोक. तुम्हाला माणसाचं प्रेम काय व्हावं ? ठीक, ते जाऊं दे, यंदा पीकपाणी कसं आहे म्हणतों मावशीकडं ?

**अबदुल** : हं. ठीकच हाय मनायचं ! देवाच्या दयेनं लई लई तर सा आने पदरात पडले तर ती बी नशीबच.

**सखाराम** : सहा आणे ! काय आबदुल, ह्या वाड्याकडं, मावशीच्या दाग-दागिन्याकडं, शेताकडं बघून कुणाला तरी खरं वाटेल कायरे हें ? अरे बाबा जनामावशी नशीबवाली आहे. यंदा चौदा आणे पीक घेणार जनामावशी. सोडणार नाहीं.

**अबदुल** : मावशीच्या सोन्यानान्याचा, वाड्याहुड्याचा न् अवंदाच्या हुब्या पिकाचा काय लागाबांधा बाबा ? तुमि काई मना, तांबारा पडलाय्, सहा आनं पीक बि हाताला लागायूचं न्हाई.

**सखाराम** : तुला काय पिकाचा अंदाज बांधतां येणार ? तूं नुमता नांगऱ्या, नक्कीच यंदा चार सहा तोळे सोनें आणणार घरात मावशी. पण हा आमचा चंदा. त्याला कुठं खाववलं जातंय गुणानं ? हजार भानगडीन् लाख लफडीं करीत बसतो. सोनं पिकतंय् घरात; तरणी ताठी बायको, त्यांत रूपानं; गुणानं तशीच. अन् ह्याला ? ह्याला हव्यात उनाडक्या. अन् हेंच आम्हीं बालमित्र म्हणून सांगायला जावं, तों तोंड दिसतं आमचंच. हं ! बरं, पत्र तरी घरीं पाठवतो का रे जेल मधून कधीं ?

**अबदुल** : येतं मनं कधीं कधीं.

**सखाराम** : कधीं कधीं ! घरीं कशाला पाठवील तो पत्र ! चळवळीच्या नांवाखाली काय थोडा धांगडधिंगा चालतो ! इकडं घराला आग लागायची वेळ, सरकारी खर्चानं आठवड्याला मिळणारं पत्र. पण तेंही घरीं पाठवतां येत

नाहीं. कमाल आहे या बेफिकीरपणाची. हं! रात्री काहीं जास्त तर नुकसानी झाली नाहीं ना रे अबदुल ?

**अबदुल :** तसं काई न्हाई. पन् थोडा थोडा मार लागलाय् लोकास्नी.

**सखाराम :** म्हणजे ? न्हाई भाबीलाही लागला ?

**अबदुल :** हं. लागलंय त्येस्नी बी. अन् जनामावशीलाबि लागलंय डोस्क्याला बरंच.

**सखाराम :** अरे! अरे! अन् तरीही ती शेतावर गेली? हद्द आहे बुवा! ( सकाळीं लोक चहा पितांना टाकलेले चवाळे तिथेंच असतें. न्हाई झांकून दाराआडून पहाते हें पाहून तो चवाळयाकडे जातो. ) बरंय् बसतो तंवर इथं. आबदूल, मावशीला बोलावून आण लवकर, शेतावर गेलीय् नं ती ?

**अबदुल :** ( निर्धारानं ) व्हय. पन् मला हितं काम हाय रावसाब.

**सखाराम :** अन् मी काय इथं खेळायला आलोंय् ? मघापासून पहातोंय् सारं. तुझ्या वागणुकींत नवीनच रंगढंग यायला लागलेयत अलीकडं. लाकडं फोडताना काय तालांत आला होता; मला काय दिसत नाहीं ? मावशीच्या घराला आग लागलीय्. चौकशी करून ताबडतोब तलास लावणं जरूरीचं काम अन् तुझं उत्तर कीं म्हणे मला काम आहे. काय काम आहे रे ? आबदुल, तुम्हां लोकांना मावशीविषयीं किती कळकळ आहे तें दिसतंय मला. अन् पुनः सरकारी कामात अडथळा करीपर्यंत तुम्हां लोकांची मजल. फार शेफारलात अलीकडं तुम्हीं लोक. चांगलं नाहीं आबदुल हें. चौकशी, रिपोर्ट, तलास, बंदोबस्त सगळया गांवचा कारभार अन् त्यांत पुन. हें. कामाच्या बोजानं मावशीविषयींच्या तळमळीनं थोडं कमी अधिक बोलायला लागलों तर तोंड दिसतं आमचंच. ( अबदुल नाइलाजानें जातो. सखाराम चवाळयावर जाऊन बसतो. थोड्या वेळानें न्हाइला उद्देशून -) न्हाईऽ...भाबीऽ खूप लागलं कां हो रात्रीं ? कुठं कुठं लागलं ? काय लावलं त्यावर ? ( न्हाई कांहीच उत्तर देत नाहींसें पाहून ), म्हणजे तुमचाही गैरसमज आहे तर माझ्या विषयींचा. हं. चंदानं या हजार भानगडी सोडून सरळ संसार करावा; नीट ताळयावर येऊन चवचाल चाळे सोडून आपल्या तरण्यानाठ्या बायकोकडं प्रेमानं बघावं. तिचा जन्म खानदानी घराण्यांत. इकडचं तिकडं बघायची चोरी, या वयांत जर नवऱ्याचा आधार नाही, तर मग त्या नवऱ्याला काय म्हणावं! डोंगरासारखी आई

मरमर मरतेय. त्याची लाज नाहीं पुत्रप्रेमानं आईला बोलवत नसेल, मित्र-कर्तव्य म्हणून कांहीं आहे कीं नाहीं ? याच रुईनं सखाराम चंदू मित्र म्हणून जन्माला घातले, एकत्र खेळले, वाढले. आज तो चुकतोय. मला दिसतंय. मी त्याला तसं करू देणार नाहीं अन् याच शुद्ध हेतूनं मी त्यच्याशीं भांडत आलों. जगानं नाहीं नाहीं तो अर्थ त्यानून काढला. पण मित्रकर्तव्य कठोरपणानं करीत राहिलों, बदनामीची पर्वा केली नाहीं न् करणारही नाहीं मी. सत्य तें शेवटीं सत्यच ठरेल. पण ज्यांच्यासाठी ही धडपड आहे, त्यांचा तरी गैरसमज होऊं नये. भाबी, मला जना मावशी आवडते. फाड्फाड् बोलेल, ताडकन् थोबाडीतही देईल, पण सर्व आईच्या मायेनं. शंका कुशंका न् गैरसमजला वाव नाहीं तिच्याकडं. मला वाटलं होतं कीं, ज्यांच्यासाठीं मी इतका बदनाम होतोय त्यांना तरी या गोष्टीची खबर असेल....पण जाऊ दे, पाणी तरी देणार का चूळ भरायला ? तेवढी तरी आहे का आमची लायकी ? हं ! आमचं मन वेडं. चंदू, मावशी हीं जुनीं नातीं अन् त्यात पुन: दु:खांत सापडलेली एक गरीब गाय. वाटलं होतं घरातून बाहेर पडताना, किं नाहीं म्हटल तरी आता चंदाच्या ठिकाणीं आपणच आहोंत...मावशीला, तिच्यावरती हात म्हणजे काळजाला हात पुरा मोड करायचा चोरट्याचा, पुनः म्हणून डोकं वर काढता कामा नये. पण इतकं करून घ्या पदरीं बदनामीच. कांही असो, आतां ठरवलंय् कीं एकदा सविस्तर पत्र लिहायचं चंदाला. अंतःकरण उघडं करून दाखवायचं त्याला, नाहींतरी काय त्याची सुधारणा करण्यासाठींच ना इतका बदनाम झालों ? तांब्या ठेवा इकडं. मी घेतों पाणी. आपल्याच घरांत कसली लाज अन् कसला कमीपणा ? द्या इकडं तांब्या. ( म्हाई पाण्याचा तांब्या भरून दारांतून ठेवते व सखाराम चूळ भरून येऊन बसतो. ) खरंच म्हाई भाबी, लिहिणार आहें मी त्याला एकदां खडसून पत्र. एक काळ होता, अगदीं बारीकसारीक गोष्टसुद्धां चंदा मला सांगायचा. म्हणूनच जीव तुटतोय् सारखा, कलेक्टराकडं किती रदबदली करतोंय् त्याला सोडवून आणायपायीं. ( उसासा टाकून ) आतां जीवच गहाण ठेवायचा बाकी राहिलाय त्याच्याकडं. घ्या पानपुडा घ्या इकडं. भाबी, अगदीं खरं सांगा. गेल्यापासून त्यानं पत्र तरी पाठवलंय कां हो घरीं ?

**म्हाई** : ( जड मनानं आंतूनच ) नाहीं.

**सखाराम** : हं. मला माहित आहे. नाहींच पाठविणार तो ! पण कां इतका कठोर झालाय ? कुणी अशी जादू केलीय त्याच्यावरती ? कां भडकलाय नी कां

असा वागतोय कांहीं कळत नाहीं. वाईट तरी काय वाटून घ्यायचं भाबी. आपलंच नशीब असं, कोण काय करणार ? अन् तुम्हाला तरी काय म्हणायचं, तरणाताठा जीव, शेवटीं माणूसच आहात ना तुम्ही ? माणसाच्या भावना, माणसाचं मन, वाईट वाटणारच. तरी बरं, मनाच्या मोठ्या तुम्ही म्हणूनच आजवर सहन केलं. तुमची नजर, पाऊल...काय माय व्यालीय कुणाची, तुमच्या चारित्र्या-विषयीं कांहीं बोलायला ? दुसरी एखादी तुमच्या जागीं असती तर एव्हाना पन्नास घरं पाहिली असती तिनं. अन् खरंच भाबी तिनं तसं केलं तर तिचा तरी काय दोष त्यांत ? नवरेच असे करणीश्वर निघतात, धोंडे गळ्यांत पडतात. तें एक सोडा. मावशी एवढी करारी बाई. तुमच्या दुःखाकडं बघून तरी पोराचे चाळे बंद पाडावे तिनं. पण तिच्याभोंवती सगळा तोंडपुजांचा बाजार. जो येतो तो पोराच्या दुर्गुणावर पांघरूण घालून, वारेमाप स्तुती करायला लागतो. तें सखारामला जमत नाहीं. तोंडपुजेपणाचा सखाराम तिरस्कार करतो. भाबी, तुमचा कांहीं तसा गैरसमज न होवो हीच इच्छा. मला काय देवानं कमी केलय, तें मी चंदूच वाईट चिंतू ? सगळ्या गावचा कारभार माझ्या हातांत आहे. पंचक्रोशींत कुणाचं नाहीं इतकं सरकार दरबारीं वजन, सोन्याच्या तुकड्यासारख्या जमनी; अन् त्यात पुनः चंदू, मावशीचे संबंध, हे संबंध म्हणजे रेशमाच्या गाठी...

**म्हाळू** : ( आंतूनच ) एवढी काळजी होती तर रात्रीं त्यांच्याच घरावर धाड पडली, सगळा गाव जागा झाला. अन्...

**सखाराम** : हां खरंय् ! मी दिसलों नाहीं इथं तोंडपुजांच्या घोळक्यांत. खरंय्. कारण मावशीच्या पुढं पुढं करून कांही चोरटे हाताला लागणार नव्हते. अनुभव पाठीशीं घेऊन, चोरट्याचा माग काढून, त्याचा काटा काढायचा असतो. ढोंग करणं मला मुळींच साधत नाहीं. बबीला सबंध रात्रभर ताप, तरी तिला तशीच टाकून जागाबिगा पाहून गेलों अन् दिवस निघाला नाहीं तोंच धांवत आलों रात्रीपासूनच माझं माग काढायचं काम सुरू आहे. पण तुम्हालाही हवंय् तें ढोंग—पुढं पुढं करायचं. एवढं खरं कीं सत्य तुमच्यापासून दूर असतं अन् म्हणून असा गैरसमज होतो झालं. झालं गेलं जाऊ द्या. पण भाबी, माझं आपलं हात जोडून सांगणं आहे तुम्हाला. माझ्या न् चंदाच्या नात्याकडे बघा, माझ्या तळमळीकडे बघा, आणि कांहीं झालं तरी माझ्याबद्दल गैरसमज करून घेऊं नका म्हणजे झालं. मावशी मला परकी नाहीं, मी तुम्हाला परका नाहीं.

आड अडचण आहे, खुशाल घरीं येऊन सागत जा, आतां तुम्हाला थोडंसं धीट बनलंच पाहिजे. बाहेर पडलं पाहिजे, प्रसंग पाहून वागायला शिकलं पाहिजे. जग चार दिवस ठेवील नावं. मावशीला काय कमी नावं ठेविली पहिल्या-पहिल्यादां ? चालायचंच. कामाच्या व्यापामुळं मला फारसं येता येत नाही म्हणून माझं घर तुम्हाला दुसऱ्याचं नाही आम्ही नाही अडी अडचणीला उपयोगी पडायचं तर कुणी पडायचं अशा वेळीं ? ( धर्मा येतो. ) या या धर्मा पाटील. आलांत, बरं झालं, म्हटलं मावशीही नाहींत तेव्हा बोलायचं कुणाबरोबर ? या वाड्याशी असलेलं सखारामाचं नातं भाबीला काय ठाऊक ? बरं झाल, आलां तुम्हीं, येईलच आता जना मावशी. गेलाय अबदुल बोलवायला—

**धर्मा** : व्हय तर, भेटला मला त्यो वाटंत.

**सखाराम** : होय तर ! हं हं, मीही आलों होतो रात्रीच्या धाडीची चौकशी बिवकशी करावी अन् चंद्राचा निरोपही द्यावा मावशीला म्हणून. रात्रीपासून सारखी धावपळ चाललीय माझी अन् मावशी तर आपली खुशाल गेलीय निघून दिवस निघताच शेतावर. ( सुभाना आलेला असतो तो 'राम राम रावसाब' म्हणतो. सखाराम त्याला तसेच तिसरीकडे पहात 'रामराम' म्हणून उत्तर देतो. ) हं. तर काय पाटील, कालच्या कुंभारीच्या सभेला गेला होता कीं नाहीं ? काय म्हणतोय् तुमचा रशिया, लालबावटा ?

**सुभाना** : कुंभारीची सभा ? अं ? ही काय आनि नवीनच भानगड ? कुठून काय कळतं कुणाला ठावं, न्हाई तरी आमच्या रावसायबानी कुंभारी, गावठाण, शिवार, बांध फाईजे तित फाईजे त्या भानगडी उभा करता येल्यातच मना.

**सखाराम** : गध्या ! ( लगेच गावरून पण चिडून ) आपलं-तुला नाहीं बोललो काहीं.

**सुभाना** : छा, छा, छा. मी तरी तस कुठं मनतोय ? अवं गध्याशी बोलायचं तर गध्याच्याच बोलीत बोलावं लागतं. आन् आता तर तुमी मानसाच्या बोलीत बोलला. तवा मला आपलं वाटलं, मलाच मनलात जनु तुमी.

**धर्मा** : बरं बरं. बसुन घ्या या सुभानराव मंजी बगा सुभानदादा, सनवारी सभा होती न्हवं कुंभारीला, तवाच्या सभेची गोष्ट इचारल्यात जनू रावसाब.

**सखाराम** : हो हो तीच तीच

**धर्मा** : झाली. जंगी सभा झाली न् तमाशा बि झाला लालबावट्याचा.

**सखाराम** : मग काय म्हणाले, सभेतले बोलणारे ?

**सुभाना** : ते काय बोलणार दुसरं, कसल त्याची धरणी न राबल त्याची गिरणी, एकच ठोकताळा हाय त्याचा, ती काय सोसॉलिस्टी हैती व्हय, आज एक बोलायला न उद्या दुसरंच सांगायला ?

**धर्मा** : अन कॉंग्रेशीच्या सभेत तरी काय चालतं दादा ?

**सुभाना** : आरं कमलं घेऊन बसला मर्दा तू धर्मा ! एकाच देहीचे दोन हात. उजवा हात तुटला की डाव्यानं पुढं सरायचं अन तेच हेऽ हातभर लांब जिभा काढून बोलायचं. तू कर मारल्यावानी, मी करतो रडल्यावानी. सारं सोंग. समद्याचा एकच हैदोस. आमच्या म्हागं या; आमाला मत द्या, इचारायचं न्हाई बोलायचं न्हाई, मर मनलं मरायचं, मारा मनलं मारायचं, आमीच तुमचं भलं करू, बोला आता आमचीच जय. हाय् काय न न्हाई काय. गावगुंडी सारी. ह्यांनी जसे गावगुंड गावात पोसलेयत, तस भांडवलदार धनिक लोकानी ह्या हातांस्नी पोसायच, त्यान्या पैशाच्या अन् आपल्या सत्तेच्या जोरावर घाल घाल गान्या देशात हैदोस घालायचा, हे गावात गावगुंडी करून घालल्यात तसा. काई दिवस चालायचं झालं. हाय कायन् न्हाई काय घ्या रावसाब पान. पन् माझं आपल मननं की मानसानं आपल्या मनगटाचा राजा होऊन, आपल रूमण हमिशा खंबीर ठेवावं झालं. काय रावसाब ?

**सखाराम** : हं, पण सुभाना, बोलतां बोलतां चिमटे काढायची फार वाईट खोड आहे बघ तुला.

**सुभाना** : जाउ द्या रावसाब मानुस मनल की खोडी ह्या असायच्याच. आता कुनाच्या वाईट असायच्या कुनाच्या चांगल्या असायच्या ही गोष्ट एगळी, पन् कुनाला माना मुरगाळायची तर कुनाला बोटं मोडायची, कुनाला गळा काढायची तर कुनाला गळा पडायची, कुनाला चिमटे काढायची, न्हाई न्हाई तसल्या खोडी असल्यात मानसाला, जाऊं द्या झालं, हाय काय अन् न्हाई काय. घ्या सुपारी. ( सुपारी देत धर्माकडे वळून ) हं काय धर्मा, तर कुंभारीत काय मनले लाल बावटेवाले ?

**धर्मा** हं. मनत होते ते सारं आमच्या मनाचंच मनत होते मना. आमच्या सारखेच शेतकरी न् कामकरी त्यांचे पुढारी ह्या सरकारनं हजारो हजारोंनी तुरुंगांत

टाकल्याती; अन् रोज तशीच दंडेली चाललीया ह्या राज्यांत; तेलंगनात आठ शेतकऱ्याना फाशीला द्यायचं ह्या सरकारनं ठरिवलंय्. कां तर त्या शेतकऱ्यांनीं एकी करून सावकार; जिमीनदारास्नी त्यांच्या भरमसाट जमूनी काढून घेऊन हुसकून लावून जमूनी वाटून घेतल्या. काळाबाजारवाला त्यांनी न्हाऊच दिला न्हाई तितं अन् येवढ्यासाठीच मनं ही सारी दंडेलीन् दडपशाही हाय् ह्या सरकारची. हं. अन् लालबावटाच मनतो जमिनदारांच्या जमूनी एक पैसा द्यायचा न्हाईन् काढून घ्यायच्या मनून. तसंच समद्या मानसाला मीठ, मिरची, तेल, साखर, कापड चोपड मिळालंच फाईजी मनतो आन् हे कांग्रीसीचं सरकार आलं, करिल भलं असं वाटलं होतं खरं लोकास्नी: त्येंचं सौराज आलं तवा गाडगीमडकी तरी होती चार घरात, ह्या सौराजाच्या करनीनं ह्या दोन वर्सांत ती चारदोन गाडगी मडकीबी घरात ठरंनाती. गोऱ्या सायबानं लावला गळफास, ह्या कॉंग्रीसीच्या सरकारनं, चांगला पक्का जाम केलाय सौराज्याचं सोनेरी पानी देऊन; एवढंच काय ती भलं केलंय त्यांनीं निवडून येऊन. निस्त्या मतांनीं ह्ये सावकारशाही-सरकार जानार न्हाइ. जमीन न्हाई त्याला मिळाली फाईजी. हाय त्याची टिकली फाईजी अन् तीबा पोटाला पुरंल एवढी जमीन; धंदा; रोजगार मिळालाच फाईजी; सावकारी, जमीनदारी खतम केलीच फाईजी. पन ही कामं शेतकरी, कामगार; बारकी सारकी धंद्यातली मानसं ह्येनीं एकी करून, सरकारी कारभार आपुन हाती घेतल्याबगार व्हायचं न्हाइ असं मनला त्यो गडी. मोठा हिमतीचा भाद्दर दिसला मला त्यो. म्या तवाच किसान सभेचा मेंबर झालो झालं.

**सखाराम :** ( ठसक्यांत ) असं का, म्हणजे तूं लाल बावट्याचा सभासद झालास तर ?

**धर्मा :** हॉं. शेतकऱ्यांची एकी मनल्यावर मी काय एगळा हाय व्हय त्यातनं ? आमची एकी न्हाई मनूनच तुमच्यासारख्यानीं यायचं, शेफारलेत, मुजोर झालेत मनायचं, एकीकडं गावगुंडीनं अंग भाजावं तर दुसरीकडून कामधंद्याविना आडून बसायचं. जातजात शेताचा लंगुटीबर टुकडा हातात न्हायलाय त्योबी ह्या असल्या काळांत कदीं गळून पडलं नेम न्हाई. इमानानं राबून मरमर मरून सुख मनुन हाय काई जिवाला ? तुम्हीच सांगा पाटील, अं !

**सुभना :** न्हाई पन धर्मा, चार दोन बांडगुळं सोडली तर कोन सुखी हायरं ह्या गांवात, तूच सांग बरं.

**सखाराम** : हं ! खरंय खरंय !

**सुभाना** : ( खेकसून ) काय खरंय ?

**सखाराम** : नाहीं म्हणजे खरी परिस्थिती आहे ती कबूल करायला काय हरकत आहे ?

**सुभाना** : हं. हितं तोंडानं कबूल करायला काय हरकत न्हाईच. सरकारात मातर सहा आनं पीक सहा आनं सांगायला हरकत हाय. का न्हाई रावसाब ? ( धर्मास ) अरं, रावसायबाच्या चोपडीत सहा आनं पीक पानाला चुना लावी लावीपतूर सोळा आनं वाढतं न् पदरातबी पडतं. जाऊ द्या झालं, मानसाची जात खोडील. हाय काय न् न्हाई काय. ( सखारामास ) घ्या रावसाब तंबाखू.

**सखाराम** : ( चिडून ) दे फेकून तिकडं उकिरड्यावर तुझी तंबाखू. मघापासून सारख बघतोंय्...( उपरणें अंगावर घेत उठतो. )

**सुभाना** : अंऽ अंऽ आता वं ! काय झालं वं रावसाब, आपली थट्टामस्करी सुद्धा...

**सखाराम** : आग लागली तुझ्या थट्टा न् मस्करीला ! ( चपलांत पाय घालीत )

**सुभाना** : आवं आवं पन् माझं काम...

**सखाराम** : ( रागानें ) गेलं नाल्यांत.

**सुभाना** : ( दमांतच ) हंऽ...?

**सखाराम** : ( गुर्मीत ) घेऊन ये चावडीवर, मग बघेन काय तें. ( मोठ्यानें ओरडून ) रात्रीपासून डोळ्याला डोळा नाहीं माझा, तुम्हाला सुचतय् थट्टा. आधीं जना मावशीच काम न् मग गांवगोंधळ. टिवल्या बावल्या करायला कांहीं काळवेळ...... ( चरफडत निघून जातो. )

**सुभाना** : हाय काय न् न्हाई काय. गंमत हाय झालं. आता ह्याला रं काय झालंय तनतनत गेलाय त्यो.

**धर्मा** : गप बसा दादा. तुमालाबि लै सवं, खाजवून आवदान आनायची. आता ह्यो कुलकर्णी... ...

**सुभाना** : आरं न्हाऊ दे मर्दा. उगं न्हाई नांगी टाकून पडला त्यो. त्याला ठावं हाय ह्या सुभानाचा कन्का. या भादरासंगं दोन हात करायच मंजी....

**धर्मा** : आवं व्हय, पन हाताला मुडासं गुंडाळल्याबगार कशाला वं उगच सापाच्या बिळांत हात घालायचा ?

**सुभाना** : म्हाऊ दे मर्दा धर्मा. मला हायत ठावं त्याच्या नाड्या साऱ्या. आलिकडं लै घुमाय लागलाय पारव्यागत ह्या बाजूला. अन् आता येत्याल आपल्याकडबी लालबावटेवाले. पैल्यादा आल्यावर कडाऽडा हाडंच मोडून टाकत्यात मनं गावगुंडीची. अन् मनून तर तूं लाल बावटयाचा मेंबर झाला मनल्या-बराबर हबकला त्यो. मनकवडया कुठला. (जनामावशीचा आवाज येतो 'म्हाई!')

**जनामावशी** : सुभाना, कुटं हाय त्यो? ( आत येते ) सख्या आला होता न्हवरं सुभाना? ( खांद्यावरचा हासूड, हातांतली पाटी बाजूला ठेवते. )

**सुभाना** : हं. गेला आताच त्यो तुमची वाट बघून. आबा कुटं हाय?

**जनामावशी** : हाय शेतावर. तंवढी गाडी उतरून घ्या बरं दोघंजणं, गवत, गवऱ्या हायती अन् वाग्नूं, जनावरास्नी पानी पाजून दावनीला बांधून या बरं. ( दोघे जातात. जनामावशी घरात जाऊन शेंगा घेऊन येते व शेंगा फोडायला बसते, म्हाई चवाळं घेऊन जाते. ) म्हाई, सख्या बामन आला होता, घरी कुनी होतं का ग?

**म्हाई** : ( आतूनच ) व्हय, आबदुलभाई होते न् मग भाऊजी आले—ते गेल्यावरती. आज कोरड्यासाला काय करायचं?

**जनामावशी** : कर हारभऱ्याच्या दाळीचं पिठलं. दाळ दळलीय न्हवं? ताक केलं का म्हाई?

**म्हाई** : दाळ दळून झालीय न् ताक बी घेतलंय न्हवं घुसळाया आताच–

( एवढ्यात रायरंद येतो. रायरंदाचे गाणें. )

चला काकू चला काकू लग्नाला चला,
चला काकू चला लग्नाला चला
वऱ्हाड न्याया गाड्या–दारि झाल्या खड्या
धाम झाला भरला म्हसुबाला आग्नी – लग्नाला चला.
कापड चा व-ना–डोळ्यापुढ दिसता
घरि आलो कावो–तुमी घेऊ नका चला—लग्नाला चला.
नको दिवा वत्ती–तेल म्हाई हाती
अंधारात, मै राज्याच्या–उजेडानं चला – लग्नाला चला.

आन् म्हाग झालं-रेशनिंग आलं
पोळया लाडु गेलं-आता पेंड खाऊ चला—लग्नाला चला.
नवरा नवरीं घरी ठेवूं-घोडं सगं घेऊ
वरातीला जाऊं-अन् मिरवून येऊं चला—लग्नाला चला.
मनु नका न्हाइ-चला करा घाई
तुमाईना सोभा न्हाई-लग्नाला चला—चला काकू
काकू ! अवं काकू ! माझा ठका आता कुठं वयात आली काकू
साठ वर्सं आता कुठं झाली तिला काकू
दिल्लीच्या राजाची मागणि आली तिला काकू.
काकू तुम्ही लग्नाला आलच फाईनी काकू
रेशन विशन संगं तुर्पा घेऊ नका काकू
नांव माझं वद्द सार होईल वर काकू.
काकू ! अवं काकू ! ठकीच्या लग्नाच्या वऱ्हाडाला खाया
मिळावं मन दिल्लीच्या राजान समद्या राज्यातल्या तेल्याला
पेंड पिकवायचा अन् समद्या शेतकऱ्याला रताळ पेरायचा
हुकूम दिलाय काकू,
खोटं न्हाई काकू.
माझी ठकी मोठी मोठी गुनाची व काकू
लग्नासाठी फाटक तुटकं लुगडं द्यावं काकू.
नसलं तुमा नसूद्या पन ठकीला द्या काकू.
माझ्या ठकीसाठी येवढं करा बरं काकू.
चला विगी विगी चला लग्नाला चला.
चला काकू चला काकू लग्नाला चला.

( मावशी त्याला पीठ वाढते. तो जातो. एवढ्यांत पडद्यामागून सखारामपंताचा आवाज तिच्या कानी पडतो, " काय जना मावशे ! ' )

**जनामावशी :** कोन हायरं मेल्या ! अनि कोन मायरं इं आलाय ?

**सखाराम :** ( आंत येत ) मी आपला सखारामपंत कुलकर्णी आहें.

**जनामावशी** : असं, असं—( सखाराम वरती येतो. ) अन् हे नावाम्हागं पन्‌त्या कवापासून लावाय्‌लागलास रं? ये बस. कां सकाळच्या पारीच उगवलास? काई पंचांगबिचांग बगून आलास का न्हाई? न्हाई जरा चवाळं दे बरं भाईर.

**सखाराम** : ( वरमून ) पंचांग कशापायीं बरं मावशी? मी तुला रात्रीच भेटणार होतों...पण...

**जनामावशी** : न्हाई मनलं जनामावशीकडं आलाय्‌स, तवा...

**सखाराम** : मावशी. माझा स्वभाव...

**जनामावशी** : हाय ठावं मला. मुल्‌खाचा दोगल्या तूं हिकडची फुनगी तिकडं लावन्यात तुझ्या इतका हुशार सभावाचा मानूस हुडकून तरी सापडंल कां बारा कोसाच्या आत?

**सखाराम** : मी जर तुझ्याएकी असा वागलो तर माझी जीभ...

**जनामावशी** : हाय्‌च ठावं तिला. जरा कुटं चुर्‌चुराय्‌ला लागली की जनामावशी माजोरी खोडाला नथनी घातल्यागत जिभेला नथनी घालील ती. अन् मनून तर ती अशी सरळ सुनावानी वागतीया माझ्यासगं. न्हाई, चा टाक बरं चुलीवर जरासाक.

**न्हाई** : ( आंतूनच ) किती कोप टाकू?

**जनामावशी** : टाक मेलं दोन आडीच कोप, मी बी पीन मनते. हं. ( खवचटपणें ) कायरं सख्या, इक्‍त्या फाटं आलासर धडपडत. लै काळजी घ्यायला लागलास बरं का जनाची तूं.

**सखाराम** : तुझ्या गळ्याशपथ ग मावशे, रात्रीं तुला भेटलों नाहीं ही गोष्ट सोडून दे. पण रात्रीपासून माझ्या डोळ्याला डोळा नाहीं. बबी तापानं नुसती फणफणत होती. त्यांत आणि तुझ्या घरावरती धाड. रात्रीपासूनच मी चोरट्यांचा माग काढतोंय्. गप्प बसलों नाहीं. तुला भेटलों नाहीं, म्हणून माझं काम थांबतंय थोडंच? अन् एवढ्यांतच हा केसरी आला. वाचूनहि झाला. म्हटलं जाय्‌चंच आहे जनामावशीकडं तर जातां जातां वाचूनही दाखवावा झालं.

**जनामावशी** : केसरिबि वाचून दावाया आलाय्‌स. बया बया बया, वांझोट्या म्हशीला बराच पाना फुटलाय् की!

**सखाराम** : खरंच जनामावशे, येरवड्यांतून बातमी आली. शब्दावर विश्वास तूं ठेवणार नाहींस माझ्या, म्हणून म्हटलं आपलं वाचूनही दाखवावं.

**जनामावशी** : ऑ ! काय मनलास ! येरवडयाची बातमी ! ! कायरं मेल्या, माझा चंदा सुटलाय व्हय ?

**सखाराम** : अं हं.

**जनामावशी** : जळ्ळा तुझा केसरी न फेसरी, मेलं कार्ट तरी काय आलंय जन्माला ! बापाला समूदा गांव हादरायूचा, न् ह्यो बसलाय् मेला तुरुंगात टुकडं मोडीत.

**सखाराम** : हं. मीही तेंच म्हणत होतों.

**जनामावशी** : ( थोडें तिरस्कारानें ) काय मनत होता ?

**सखाराम** : नाहीं म्हणजे......

**जनामावशी** : न्हाऊ दे मेल्या, करून सवरून वरती नाक उच करून बोलतोयूस, लाजाबि वाटत न्हाई.

**सखाराम** : जनामावशे, तुझ्या शपथ गं, माझ्यामुळं नाहीं तुझा चंदू तुटला तुला. त्यान्या सुटकेपायीं आतां जीवच गहाण टाकायूचा बाकी राहिलाय मावशे. माझं हेंच सरकार दरबारीं वजन पहावलं जात नाहीं काही लोकांना. अन् म्हणूनच अस काहीं तरी कुभांड चिकटवताहेत माझ्या अंगाला. नाही म्हणजे माझं म्हणणं असं कीं आपल्या चंदानं तरी कशाला असल्या नसल्या भानगडींत पडायूचं ?

**जनामावशी** : नसत्या भानगडी ! काय कुनाची चोरीबिरी केलीय ? का कुनाची पोरगी पळवलीय् ? कुनाच्या नाकाला पदर आलाय् रं मेल्या त्येच्या भानगडीमुळं ?

**सखाराम** : जाऊं दे, आम्ही कशाला सांगावं तिन्हाईत माणसानं ? ज्याचं त्याच्या संगं. आम्हाला आपल वाटतं आमची पोरं काय चळवळ करीत नाहींत ? नित्यनेमानं संघांत जातात माझीं दोन्ही भावडं. व्यायाम, अभ्यास, चळवळ— अगदीं बिनधोक चालू आहे त्यांचं. त्याची झळ म्हणून घरच्या माणसाला नाहीं. नाहींतर हा चंदा ! बेचाळीस क्रांति, बंड, कामगार शेतकरी लढा, रशिया, काय नाहीं नाहीं ते छंद घालून घेतलेत डोक्यांत त्यानं. ( विडी शिलगावतो. ) एक लंगोटीनं या रुईत वावरलों. मनांतलं गुपीत फक्त एकमेकांनाच सांगितलं आम्ही. म्हणून चंदासाठीं जीव तुटतो सारखा. आतां हेंच बघ बरं, वाचलं, वाईट वाटलं, धापा टाकीत तुझ्याकडे आलों क्षणाचीही उसंत न घेतां.

**जनामावशी** : मेल्या सांग तरी एकदां काय हाय ती. गुपीत ठेवायचं न् गुनवून बोलायचं भारी रं खोड मेल्या तुला. सांग बरं चटदिशि काय हाय ती.

**सखाराम** : वाचतोंच झालं. ( वाचून दाखवतो. ) " येरवडा मध्यवर्ती तुरुंगांत लाठी हल्ला, अठरा बंदी जखमी......

**जनामावशी** : पन् कायरं माझ्या चंदाचं काई लिव्हलंय् कारं त्यांत ?

**सखाराम** : तसं असतं तर मी सांगितलं नसतं होय तुला ? कुणी काय केलंय् नि कुणाला काय झालंय पत्ताच लागत नाहीं यांत. ( पुढें वाचीत ) " जेवण बरोबर मिळत नाहीं म्हणून येरवडा मध्यवर्ती तुरुंगांतील दोनशें राजबंद्यांनीं अठरा दिवसापासून अन्नत्याग सुरू केला आहे. त्यांना जबरीनें अन्न भरवण्याचा प्रयत्न करीत असतांना त्याचा प्रतिकार करण्यासाठीं सर्व राजबंद्यांनीं कोठडींत बंद करून घ्यावयाचें नाकारल्यावरून प्रकरण चिघळलें, नि त्याचें पर्यवसान गंभीर लाठीहल्ल्यांत झालें. सविस्तर बातमी अजून हातीं आली नाहीं. " ( उसासा टाकून ) एवढी जरबवाली बाई, मावशे, तुला काई आपला पोरगा जरबेंत वाढवतां आला नाहीं.

**जनामावशी** : ( गहिंवरून ) काय करूं सख्या, पोरगा त्यो तेवढाच. काई झालं तरी पोटचं पोरच ते. आई त्याला कधीं वाईट चिंतीत न्हाई, इमान सोडत न्हाई कधी. येवढा चंद्या गेला. शेताकडं ढुकून बघता येत न्हाई मला. म्हून काळ्या आईनं सोडलंय का इमान आपलं ? तिच्याच जिवावर चाललंय न्हवं का माजं सारं ? हाय चार दिवस माझा कुडीत जीव, तंवर मारिल उड्या. वाटतं, माझ्या म्हागं चट लागंल रांगंला. ( थांबून ) पन कायरं, माझा चंदा खुशाल असल कारं ? ( न्हाईकडून चहाचा कप घेऊन त्याच्या पुढं ठेवते. )

**सखाराम** : हं, तोच प्रश्न आहे. पण अत्यवस्थ कुणी नाहीं ही एक त्यांतल्या त्यांत सुदैवाची गोष्ट आहे. अन् म्हणूनच तर सांगायला आलों होतों. त्यांत तो पुनः उपासांत आहे म्हणे. काय होत असेल त्याचं ! ( उसासा सोडून ) भगवंत जागे ! मावशे, तूं आई आहेस त्याची. वळव मन त्याचं. अजूनही त्यानं माफीपत्र लिहून दिलं तर......

**जनामावशी** : तर ! तर काय होईल रं ? त्यानं कुणाचं काई वंगाळ केलंय ? चोरी, दरोडा, लावालावी, कुनाची बाईल ! काय केलंय काय त्यानं माफी मागाया ? अं ? कुनाची शेतं हाडपलीत ? अदावतीनं गंजी जाळल्या ?

म्हारा ढोराकून कुना शेतकऱ्याचं हुबं पीक कापलं ? कुनाची गुरंढोरं मारली का कुनाची आई भैन रंडकी केलीय–ती माफी मागायची ? मी मेली आई. वाटतं, पोराला वाळूची भाकर खावी लागत आसल तिथं; कुटं गवताची भाजी पोरासमुर येत आसल. पोरगं आम आवचिंद, बगवलं गेलं न्हाई तर शिपायाच्या बंदुकीबरबी झुंझ खेळायचं आन् लागलं बिगलं तर .....

**सखाराम** : नाहीं म्हणजे......

**जनामावशी** : गप बस मेल्या. दातखिळ बसू दे तुझी. चा घे त्यो. मनं माफी फाईजी. ( दाराच्या बाजूनं टापाचा आवाज येतो ) कोन हायरं तिकडं ? न्हाई, हासुड घे बरं, आंगनांत गाडाव घुमलंय जनू. ( बाहेरून मावशीऽमावशीऽ अशी हांक येते. ) कोन हायरं मेल्या ? ( सख्या उठून पहाणार तों गेन्या समोर येतो. )

**गेन्या** : मावशीऽ सायब आल्यात. ( सखारामास ) रावसायब.

**सखाराम** : अं ! म्हणजे फौजदार साहेब आलेयत ?

**गेन्या** : फौजदार सायब न्हाई, आपले ओरसिर सायब—जमन सायब आल्यात.

**सखाराम** : (जीव भांड्यांत पडल्यागत ) असं, असं, (मावशीकडे पहातो.)

**जनामावशी** : ( सखारामास ) जा घेऊन ये त्येस्नी आंत. ( सखाराम जातो. जनामावशी आवराआवर करते, सायबाला बैठक टाकते व स्वतः थोडें आडोशाला बसते. सखाराम पुढें, जमन साहेब मागें असे येतात. )

**सखाराम** : ( लोचटपणें ) या या साहेब, बसा. ( गेन्यास ) गेन्या ! आरे ए गेन्या, तिथल गवत टाक घोडीपुढं. न् कुठं जाऊ नकोस ऑ.

**जमनसाहेब** : काय जन मावशी ! राती तुमचे घरावरती चोरटे आले होते मन. शेटला बी कलला समदा. लई वाईट वाटला त्येस्नीं.

**सखाराम** : अहो वाटायचंच. हें काय सांगणं झालं ? शेटला नाहीं वाईट वाटायचं तर कुणाला ? शेट म्हणजे लाख माणूस.

**सुभाना** : ( प्रवेशून ) कोनचा शेट मंजी लाख मानूस ? राम राम सायब. राम राम रावसायब.

**सखाराम** : नाहीं—म्हणजे या या या पाटील. हे आपले ओरसीयर जमनसायब आले आहेत. साहेब, हे आपले सुभानराव पाटील. चंदाइतकाच मावशींचा यांच्यावरती जीव.

**सुभाना** : सायब मला वळखल्यात चांगलं न् मी काय नवा हाय होय रावसाब त्यास्नी ? अं ? हां, काय सायब, सकाळच्यापारीच पायधूळ झाडलीत कंदी न्हाई ती.

**सखाराम** : ( मध्यें तोंड घालून ) हं म्हणजे आपले शेट...त्यांना कळलं...

**सुभाना** : व्हय. आमालाबि कळलं होतं की आपल्या रावसाय्बाला हरक्या वायूव झालाय् अन् सारखं बडबडल्यात मनून...

**सखाराम** : ( आपला पागउतारा जमनसाहेबास कळूं नये म्हणून सुभानास ) नाहीं म्हणजे तशी बरी आहे त्याची प्रकृती आतां. म्हणूनच ओरसीयर साय्ब मावशीकडे आले प्रथम.

**जमनसाहेब** : ( बुचकळ्यांत पडून ) अं... ? म्हणजे ?...

**सखाराम** : ( जमनसाहेबास ) नाहीं म्हणजे आमचे चुलत बंधू,— त्यानाही पण रावसाहेबच म्हणतात हे लोक. फारच आजारी होते ते. मी मुद्दामच नाहीं सांगितलं तुम्हाला तें. बरंय आतां. ( सुभानास ) घ्या पाटील पान.

**सुभाना** : ( सखारामकडे रोखून पहात ) आन् तरीपन तुमी आला होता तर हिकडं— अं ?

**सखाराम** : ( बुचकळ्यांत पडून ) अंऽ मी अंऽ मी म्हणजे...

**सुभाना** : तुमी मंजी चोरट्यानीं गोंधळ करून गेल्यावर वो.

**सखाराम** : हो हो हो, तसा आलों होतों तर. यायलाच पाहिजेन्. पण बबीला खूपच ताप होता रात्रीं म्हणून मावशीला न भेटतांच गेलों झालं.

**सुभाना** : ( समजलं अशा अर्थानें ) अस्सं का ! बरं आपलं न्हाऊ द्या आतां, सायब आलेयत, त्येस्नी काई बोलायचं असंल मावशीसंग.

**जमनसाहेब** : हं हं, तेच. राती च्योरीचे एळी धमाल झ्याले, ते समदे शेटला कलले. परवा सांजलाच शेट मुंबईहून आले. आज सकाली शेट उटल्याबराबर त्यानां ही गोट कलली. लई वाईट वाटला त्येंला. पन मग मनला मोटी बहाद्दर बाई हाय. मुद्दाम जना मावशीचे भेटीला तुरुत जायला सांगिनला त्येनी मला. काई मदत बिदत फाईजी तर सांगून दे मावशी. ते बी शेटनी मला बोलून टाकला.

**सखाराम** : हो, आतां मावशीचं घर गांवांत होतं अन् मावशी अशी हिंमतवाली म्हणून रात्रीं चोरट्यांची डाळ शिजली नाहीं. हेंच आतां गांवाबाहेर

शेतांत उभं पीक आहे. चंदा बिचारा तिकडे दूर तुरुंगांत. मी काय, सुभाना काय, आम्हीं सगळी आपलीच माणसं खरीं, पण सुगीच्या दिवसात यायला हवं इतकं लक्ष देणं कठीण त्यांत शेठ म्हणजे मोठा दिलदार माणूस अं! अहो बातमी कळते न कळते तों साहेबानं मावशीकडं मदतीसाठीं पाठवलं. मला तर मावशीच्या पिकाची फार काळजी वाटते. अलीकडं चोरट्यानी नुसता धुमाकूळ मांडलाय.

**सुभाना** : अवं रावसाब, लोक तर मनत्यात कीं हे चोरटे जादटोनाबी करत्यात मनं. भारी बनलेली हाय व ही टोळी. बघतां बघता माणसाच्या डोळ्यांत माती घालत्यात. नाना सोंग न ऱ्हाई ती ढोंग घेत्यात व हे. कदी तुमच्यावानी दिसत्याल तर कंदी हेंच्यावानी दिसत्याल. आता तुमीच सांगा, असं काई ऱ्हायला लागलं, तर मानसानं काय करावं तरी काय ? आं ? काडा रावसाब, काडा कातचुना.

**सखाराम** : खरंच साहेब, मला तर हे काम फारच कठीण वाटूं लागलंय अलिकडं. पोलीसपाटील तर गांवांतल्या कुठल्याही कामांत काडीचं लक्ष घालीत नाहीं न् या चोरट्यांच्या पुंडाईनं मी तर अगदीं मेटाकुटीला आलोंय् साहेब. ( चिडल्यासारखे ) सगळीकडं मीच बघावं...

**सुभाना** : अन् खरं का वो रावसाब, तुमीत्री राजीनामा देनार मनं कुळकरपनाचा ?

**सखाराम** : ( दचकून ) अ ! मी ! कां म्हणून ?

**सुभाना** : मंजी या कटिन कामाला कटाळला मनुन वो.

**सखाराम** : ( अवसानानें ) अरे सोड ! राजीनामा देतोंय ! या चोरट्यांचा काटा काढीन, तरच नांवाचा सखारामपंत कुलकर्णी. ( मावशीकडे वळून ) मावशी, निर्धास्त रहा तुम्ही.

**जमन** : आमी बी आमच्या कंपनीची ममदी मदत कुलकर्णीला देते. शेटनी तर सकालीच बोलला. अरे साला आमचे कंपनीचे च्यालीला बी हे चोरटे तरास देऊन राहीली साला, हाई काय ?

**सखाराम** : तुम्हीं काहीं म्हणा मावशी, मला मात्र या आबद्याचा दाट संशय येतोय. अहो परवांच बोलतां बोलतां मला म्हणाला...

**सुभाना** : काय मनला, चोरींत तुमचा वाटा ठेवतो मनून ?

**सखाराम** : ( खजील होऊन ) अहो हें काय पाटील ! चोरटा कसा आपण चोर असल्याचं सांगेल ?

**सुभाना** : हं हं, मीबी तेच मनतोय. आसंच कधी कधी बिनउदानं भुन बोलाया लागतं. तवा मला आपलं वाटलं झालं. न्हाई तर मग तुमाला कसं कळलं वं ?

**सखाराम** : परवाच तो म्हणाला नाहीं कां ?—आपले धर्माजी पाटील होतेच की समोर. हाल, आबदा चाललीय् उपाममार होतेय म्हणून ? अन् तुम्ही कांहीं म्हणा. उपाशी माणूस कुठल्यावेळीं काय करील अन् कसं करील हे कांहीं म्हणून सांगता येत नाहीं माणसाला. काय साहेब ?

**जमनसाहेब** : हं हं, खरंय् खरंय्.

**सखाराम** : आणि सरळ पेटीपर्यंत पोंचायला चांगला घराची माहिती असणारा, घरांत वावरणाराच माणूस असला पाहिजे-- नाहीं का ?

**सुभाना** : खरं मंजी छडा लावल्याबगार खडा मारून वरखडा काढायचा अन् वर फडा काढून चावायची भारी खोड रावसायबास्नी.

**सखाराम** : ( चिडल्यामुळें ) पाटील...

**जनामावशी** : ( आंतल्या बाजूनेंच ) सुभान...जरा चार चौघं...

**सुभान** : झाऽलं ? मावशी, तुमालाबि ठावं न्हाई व्हय ? रावसाब, मी, चंदा एका जिवानं वाडलो. हुक्की आली, लागतो कराया जरा थट्टा मस्करी. खरं मनजी चोरटे आले होते ह्या दारापतुर. अन्...( सखारामकडं पाहून ) पन जित्याची खोड मेल्याबगार कशी जाईल अं ? मानूस मंजी पक्कं खोडिल जनावर हाय्. काय ? घ्या जरा मावशी आतून इस्तू बिस्तू .

**सखाराम** : पण पाटील, खरं म्हणजे तुमची ही थट्टा, मस्करी कधीं एखादे वेळीं जीव घेईल माणसाचा हे कांहीं सांगवत नाहीं. हं, घ्या बिडी घ्या पाटील. ( सुभानाला बिडी न् साहेबाला सिगारेट देतो. मावशी आंतून काडी पेटी देते. )

**सुभाना** : हां, ह्येच्यावर मातर आपला इस्वास न्हाई बाबा. ( बिडी-शिलगावतो.) काय सायब, आवं मानूस आपल्या करनीनं त्येच्या मरनानं मरतं. थट्टान् मस्करीनं कुटं मानूस मरतं व्हय ? इचारून बगा फाईजे तर कुणालाबी. आता ह्यो अवद्या. ( खंचटपणें ) काय सायेब ! चांगले रावसायबाचे कपडे शिवाया आले, शिवावं, पोट भरावं, आन लागलाय् की वो मावशीच्या शेतावर जाऊन आभाळातल्या भोंडर्यांच्या म्हागं. मर मनावं बेट्या आपल्या मरनानं. (बेड पांघरून) न्हाइ पन कावो रावसाब, मला हे कळत न्हाई, मानुस उपाशी झालं की चोरीच कराया निगतं का वं ?

**सखराम :** ( तत्त्वज्ञाचा आव आणून ) हं, म्हणजे त्याचा तोल सुटतो, शंकेला वाव मिळतो. नाहीं साहेब ?

**जमनसाहेब :** हं...हं...

**सुभान :** मग समदेच शेतकरी......

**सखाराम :** हं ! जाऊं द्या पाटील. आमचं काम आम्हीं करूं.

**सुभान :** तुमी ते कराया होवच मना.

**सखाराम :** हं ! करावंच लागेल. हा दहा गांवाला भवणारा रोग कसान कसा मूळ चोरट्यांचा शोध लावून उखडून काढलाच पाहिजे. कर्तव्य आहे. जबाबदारी आहे आमची, ती तर आम्हांला पार पाडावीच लागेल. नाहीं साहेब ? पण मला वाटतं मावशी, तुम्हीसुद्धां या आबद्याला ठेवूं नये आपल्या कामाला. बऱ्याच जाणत्यांना शंका आहे त्याच्याबद्दल. अगदींच नाइलाज झाला तर द्यावं शेत कंपनीकडं. शेठ पोटच्या लेंकराप्रमाणें सांभाळ करतील. अन् नियमित खंडहि येत राहील. रिपरिप नाही न् समूसमू नाहीं. काय साहेब ?

**जमनसाहेब** : हं, ती तो लाख गोट होईल.

**जनामावशी :** ( त्वेषानं ) सख्या, मेल्या हीच मदत घेऊन आलायस व्हय रं जनामावशीला अं ? आबाला काडा, शेत कंपनीच्या हवाली करा. चंदाएकी माफी मागा......

**सखाराम :** नाहीं म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं आबदुलला काढा न् आपल्या धोंड्याला ठेवा पाहिजे तर...

**जनामावशी :** ( चिडून ) ॲहॅ हॅ हॅ ! भारीच कळवळा आलाय की रं माव-शीचा तुला ! कळतंय मला. सारूळकराच्या साखर कारखान्याची साखर लागलीय न्हवं तोंडाला ? मनुन चुरचुराय लागलीय जीभ. ध्यानांत ठेव सख्या, माझ्या काळ्या आईएकी पुना जीब उचलली तर चार बगनार न्हाइ, चौथं बघनार न्हाइ—हितूनच इळा फेकून जीव घेईन ! म्हागल्या दारानं सायबाला न् त्येच्या कंपनीला घेऊन येतोयस व्हय रं माझ्या घरांत ? मेल्या. इमानी कोन न् बेइमान कोन सारं कळतंय मला. घवानितला कुत्रा मेला...

**सखाराम :** नाहीं म्हणजे मावशी... आपला चंदा...

**जनामावशी :** आता गप ऱ्हा न् बोलू नकोस जास्ती. चंदाचं नाव घेतोय ! पायाची तरी सर येईल का मेल्या तुला त्येच्या ? चालता हो हितनं. अन् पुना उंबरठा चढून आलास तर याद राख माझी मी खंबीर हाय निस्तरायला. ( सगळे उठतात नि निघतात ) पांढऱ्या पायाचा हलकट मेला.



## दुसऱ्या अंकामधील पात्रें

**वेळ : दुपारचे चार वाजले आहेत.**

**जनामावशी**—पुढें चालू

**लक्ष्मी**—सुभानाची बहीण

**म्हाई**--पुढें चालू

**सुभान**— ,,

**धोंड्या**— ,,

**धर्मा**-- ,,

**अबदुल** ,,

**इतर गांवकरी.........**

**टीप**—मध्यंतरीं एक वर्षाचा काळ गेलेला असतो. जनामावशी खूपच खंगलेली असते, वाड्यालाही बरीच अवकळा आलेली आहे.

# अंक दुसरा

[ जनामावशी उजव्या बाजूच्या वींग जवळ आपल्या दारांत सडकेकडे तोंड करून उभी असते.]

**जनामावशी :** ( सडकेच्या बाजूनेंच तोंड करून ) हालकट मेला ! कसा मान खाली घालून चाललाय बगा. भानस गावचा उचल्या ! आरं, जरा मान वर करून चाल की, निलाजऱ्या ! आरं गोरगरीबाचं सराप घेऊन काय करनार ? मेल्या. पोट न्हाई भरत तर ये माझ्याकड झाडू मागाया. अशातबी गाडी वाहून घालीन मेल्या तुला घास. ( लक्ष्मी—सुभानाची बहीण—येते. )

**लक्ष्मी :** जाऊ द्या मावशी, काय लागायचय कुत्र्याच्या तोंडी ?

**जनामावशी :** गप तू. तोंड तर उघडू दे मेल्याला. दातच पाडते चेपलीनं. आरं चागला बामना पोटी जन्माला आलास अन् असा कसा निपजलासरं घरभेद्या...! राडा रंडक्याचा तळतळाट घेऊन कुठं न्हाचील ? कुणाच रं म्या वाईट चितलं ? केलं ती उपकारच कीर, अन् त्येची फेड कराया निघालास व्हय रं दिवट्या ? हात तुझा...गावकऱ्यास्नी कपनीच्या दावनीला बाधतोय मेला आरं तुला तरी आमच्या घवानीतला चारा खाता येईल कार कुत्र्या ? अ ! आर ऽ आरं ऽ आरं ऽ आरं ऽ ( दोघी अंगणात येऊन बसतात. ) काय हात धुवून म्हागं लागलाय ग लक्ष्मी ह्यो मुडदा ह्ग्या पिकात कवानाक येऊन पानी तोडत्यात मेले, अन् चोरून पानी घेतल म्हून आळ लावून पंचनामा, कोर्ट, कचीऱ्यात् दंड म्हागं लावत्यात. घर धुतलं लक्ष्मी माझं. आना माझी काळी आई ! म्मार लागलाय तिला. पानाड धरगाय लागलीय ती. ( निराश होऊन ) आना माझी जमीन. लक्ष्मी माझ्या सोन्यावानी जमनीतून मानूस चाललं की पायाला कशा गुदगुल्या व्हायच्या ग ! माझी माय. ( न्हाई गोवऱ्याची टोपली घेऊन येते व थकून बाजूला बसते.) माझा हौशा, गुलाल्या, अबद्या ! तू झेलातून येचीलं—तुला माझा गोठा ओकाओका दिसल रं ! (भरतें येऊन) माझ्या चरा, येरं राजा—किरनावानी न् घे एकेकाऱ्या मेल्याच्या नरडीचा घोट ! आरं हे कायद्याचं घाड न् गावगुडीचं गाड न्हाइ रं राजा ह्या माझ्या थकल्या हातानं रेटवत. ( उसासून ) लक्ष्मी, आता काय करूं मी ? आज पुनः पंचनामा केला मेल्यानी. चंद्रा, सुभाना, न्हाइऽन्हाईऽऽ ( न्हाई समोर येते व मान घालून उभी रहाते. )

**म्हाई** : जी.

**जनामावशी** : ये राजा. ( म्हाई खाली मान घालून जवळ बसते.) कुठं गेली होतीस ?

**म्हाई** : ( खालीं बघतच ) गौऱ्या येचाया.

**जनामावशी** : ( वेड्या स्थितीगत होऊन ) ऑ ऽ ! बोलू तरी नगस. माझ्या सोन्यानं भरल्या हाताला शेन गोळा करायची पाळी आली.

**लक्ष्मी** : मावशी, तुमीच जर अशी कंबर बसवून घेतलीत तर......

**जनामावशी** : अः मी ऽ मी कंबर बसवून घेईन ? लक्ष्मी एड लागलं का काय तुला ? जगायचं तर वाघरावानीच—अजून माझ्या कानांत हाय ते त्यांचं बोलनं. पन ते काय मला एकटीलाच बोलायचं ? समद्याच मराठ्याएकी बोलायचं पन आज ऽ समदे गावकरी.........आगं कितीबी केलं तरी आपुन बाई मानुस. तरीबी गावकऱ्यांनी तसूबर मान वर करूं दे. ही जना—निस्त्या ह्या पंजानंच कोंबडं मुरगळून टाकावं तसं एकेकाला दिसंल तिथं दाबून टाकील. माझा चेरा, सुभाना ह्ये ऽ लोखंडाच्या कांबंगत ताठ हुबे हायत. ( अभिमानानें ) असा हुरूप येतो. ( कष्टी होऊन ) पन माझा अबया झेलात गेला, वरीस झालं. माझ्याच घरावर दरोड्याचं कपटनाटक केलन् हाकनाक माझ्या आबाला चॅपटर खाली झेलात घातलं. गावकऱ्याच एक सोड, पन त्यानंग कसा आपला म्हराटीरगा दावला न्हाई. ध्यायच्या होता मेल्यांच्या नरडीचा तिथल्या तिथं घोट. ( लगेच सावरून ) पन् त्यो तरी काय करनार मना. मेल्यानीं अवचित् घाला घातला. इचार बी कराया एळ मिळाला नसंल. त्याची बायका-पोरं ( ऊर भरून येतो ) ह्या गावगुंडीचं मड बसल. लक्ष्मी, काय ग असं एकदम चौकून रान उठावं...नशीब झाल !

**सुभाना** : ( प्रवेशून ) मावशे, तू नशीबावर हावाला टाकाय् लागलीस ? अन् सुभानबि काय मेला व्हय तुझा ?

**जनामावशी** : ये सुभान बस, ( उदास मनस्थितींतून बाहेर पडत ) लई दिस झाल. पानी सांचल होत. फुटला बांधारा—झाल मोकळं. (आत्मविश्वासानं) जाऊ दे, सोभन मीबी तुझी आई. हं, सांग काय झालं ?

**सुभाना** : व्हायचं काय आनी दुसरं ? बसला टोला.

**जनामावशी** : कितीचा ?

**सुभाना** : दोनशे रुपयाचा.

**जनामावशी** : ( आश्चर्यानें ) दोनशे ! ( सावरून ) हं ऽ कांग्रिसीची मानसं काई भेटली बीटलीं का ? चळवळवाली !

**सुभाना** : हं भेटलो जाऊन त्येस्नीबी.

**जनामावशी** : काय मनली ती ?

**सुभाना** : काय मननार ? ( खेदानें ) जाऊं दे झालं.

**जनामावशी** : बरं पन् आपला चंदा कधी सुटनार बिटणार काईबी काईबी बोलले न्हाईत ? आरं चळवळवाला मनूनच चंदाला झेलांत टाकलाय न्हवं ?

**सुभाना** : व्हय मनं. पन त्याची चळवळ जरा एगळी हाय मनं.

**जनामावशी** : आरं असंल, पन् म्हून काय झालं ? काईतरी बोललं असल्यालच की.

**सुभाना** : तसं बोललं म्वॉप. पन गर्जेल त्ये पडंल काय न् बोलंल त्ये करील काय ? कोरड्या हिरीला मोप लागलंय बोलाचं न् धीराचं पानी. पर करनीच्या मोटत काय ? ( आठवून थोड्या आनंदांतच ) हं, ह्या गावगुंडीएकी कॉग्रिसीच्या मानसाकुंडं काई नेट लागत न्हाई, तवा मनलं जावं हापिसावर लाल बावट्याच्या. गेलों. तिथंबी झाल बोलणं सावंतासंगं थोडंसं. ती मनलं ( दाराकडं व चोंहोंबाजूला पाहून ) तुमचा चंदा लाल बावटेवालाच हाय. त्यो सुटलाय झेलातून. तिकडं कुनींकडं वारल्याच्या मुलखात गेलाय मनं शेतकऱ्यात काम कराया.

**जनामावशी** : ( आनंदानं ) माझा चंदा सुटला ? मग का आला न्हाई त्यो घरी ? अन् चळवळ करायची तर हिकडचे शेतकरी काय मेल्याती व्हय ?

**सुभाना** : सुटलाय न्हवं, मग येईल येळवकूत बघून. आसल्या खाईत त्यानं तरी कशाला यावं धडपडत ? त्यो सुटला मन सांगूं बिंगू नका कुणाला हं.

**लक्ष्मी** : दादा, आरं पन मावशीला इचारतुस का जेवला विवला मन, का आपलं......

**सुभाना** : ( मावशीस ) काय मावशे, जेवली न्हाईस ? उपाशी न्हाऊन चालनार हाय व्हय ?

**जनामावशी** : न्हाई रं सुभान, जेवानंच गोड लागंना बग. येवढी गुनाची सुन न्हाई, चिमनीवानी एवढं एवढं त्वांड करून घाल घाल घिरटया घालतीया माझ्या भंवती. तूंच सांग बरं कशी लागावी गोड भाकर ?

**सुभाना** : मावशी, हे बघ, हात पाय हालत्यात तंवर रेटलंच फाईजी. असं मनाला सारखं सारखं लावून घेऊन भागतंय व्हय ? भाबी......

**न्हाई** : पन आई, खरं मंजी तुमी असा तिकडचा घोसरा घ्याया लागला कीं मलाबी कसनुकं वाटतं बगा. न्हाईतर मी तरी कां लावून घेईन जिवाला. आईच्या पक्षी बी काळजाला लावून मला तुमी ठेवताय अन तिकडच्यांच नांव निघालं तर फौजदार मामलेदाराला बी घाम फुटतोय. माझ्या कुकाचा जोरच हाय तसा. माझं काय वंगाळ झालंय ? गौऱ्या इचीन पन मानानं ताठच न्हाईन. तुमचीच सून हाय न्हवं ?

**सुभाना** : म झालं तर, बगा बरं भाबी मग घरांत काई पिटबिट हाय कां, नसलं तर आना जा तिकडून चार भाकरी वैस पिटलं. हं जा. न्हाई. (लक्ष्मीस) ब ये, तूच आन जा. सुख दुख संगंच हाय. काडू काईतरी डोस्क्यातून. करू काई तरी. न्हातंय काय आसंच ? पन आज पुना काय झालं ?

**जनामावशी** : व्हायचं काय आनि दुसरं ? पुना पंचनामा.

**सुभाना** : अं ! होय कां ?

**जनामावशी** : हं. अन् वरती जमीन आकुर करायची धमकी. त्याचं काई न्हाई. पन् सुभान, हे पंचनामा, कोर्ट, कचेच्या, दंड अन् ही गावगुंडी--जीव घायकुतीला आलाय बघ खरं मंजी. कायरं सुभाना, ह्या कायद्याला काईच कारं दिसत न्हाई ?

**सुभाना** : कां बरं ?

**जनामावशी** : न्हाई, ह्या गावगुंडीचं तर हायच तसं. जमीनबि पिक धरीनाय. आमी त्यांचं पानी, पाट फोडून आपल्या शेतांत घेऊन करूं कायरं ? हें काय सरकारला दिसत न्हाई ?

**सुभाना** : एक दिसतंय—तुझ्या शेतांत पानी गेलं—कसं गेलं, कुनी घातलं, हें दिसत नाहीं...पन् तेवढंच बस्स झालं. मोडला कायदा. अगं मावशे, त्यो लाल बावटेवाला मनत होता कीं सध्याचं सरकार मनंल तसा कायदा फिरतो. अन् म्हनूनच हाजारों शेतकऱ्यांचीं, कामगारांचीं पोरं अन् त्यांचे फुडारी झेलात कुजाय

लागल्यात. अगं ह्या सरकारचा कायदा मंजी काय गरिबांच्या न्यायासाठीं हाय ? त्यो गरिबास्नी न्ह्यायासाटी हाय न्ह्यायासाटी—मसनांत !

**जनामावशी** : न्हाईरं, पन ह्ये कसं दिसत न्हाईरं त्येला ?

**सुभाना** : काय ?

**जनामावशी** : शेतकऱ्याला दोन पानी न् कारखान्याला एक, असा कायदा हाय न्हवं ? अन् कारखाना तर राजरोस दोन पानी घेतोय.

**सुभाना** : मनलं न्हवं, त्योच खरा कायदा.

**जनामावशी** : अं, तसा कसा आसंल ?

**सुभाना** : हाय, पन त्यो गुपित कायदा हाय.

**जनामावशी** : मंजी काळ्या बाजाराचा न्हवं ? अरं, गंगेचं पानी-आईचं दुध-त्याचाबी काळाबाजार ! ( कष्टी होऊन ) हं: जमाना !

**सुभाना** : मग त्यात काय झालं ? जत्रेच्या एळीं एक्कावन रुपये दिलं अन् गंगेच्या पान्यांत वर्सातून एकदां बुचकळून निघालं की फिटलं पाप. न्हाई तर सध्याच्या दिसांत गांधी बाबाचं नाव हायच की पापातून मोकळं व्हाया. गावगुंडी सारी. हाय काय न् न्हाई काय. चल जनामावशे, खा दोन घास न् पी पानी. न्हाईतर आसं कर बाये. मी बस्तो हितं, धर्माला जरा धाडून दे जाता जाता अन् ह्या दोघीस्नी घेऊन जा घरीच आपल्या. जा मावशे, भाबी, जा उठा लगोलग.

**जनामावशी** : न्हाई सुभान. ( सुभान मावशीकडे दुःखितपणें बघतो. ) तूं जा न्हाई. मला न्हाई भूक.

**सुभाना** : मावशे, येता येता मी आलोय् पानी पिऊन. तूं जा बरं मावशे. तुझ्या पाया पडतो. जा. जा बघू भाबी. ( त्या नाइलाजानें उठतात. ) मी हाय हितं तुमी येई पतुर, तेवढं धर्माला मातर लावून द्या हिकडं अं. काम हाय. ( तिघीही जातात. सुभाना मुंडासं काढून विचार करीत बसतो. वींगजवळ, पडद्यांतून एक फकीर गाणं म्हणायला लागतो. )

( गाणें )

**सौदा करना सीखले ये दो दिनका बाजार**
**कोई कहेता मतलबसे भरा**
**कोई कहेता दर्द दिल भरा**
**कहता कोई झूट पसारा**
**सचझूट समझले यार-दो दिनका बाजार ॥ १ ॥**

खून चूस कर पाप खरिदले
या खून बहा पुनको खरिदले
सब सुख त्याग और दुखको मिटादें
कुछ तो कर बेपार-दो दिनका बाजार ॥ २ ॥

ऐष आराममें उमर को खोया
बैल गमाये रस्सिले आया
बाजार का रंग रूपक्या पाया ?
क्या खाया तू हार ? दो दिनका बाजार ॥ ३ ॥

( सुभान चंचींतून दोन पैसे काढून फकिरास देऊन येऊन पुनः विचारांत बसतो. बाहेरून धोंड्याची 'मावशीऽमावशीऽ' अशी हांक येते. कुणी ओ देत नाहींसे पाहून तो स्वतःच आंत येतो. )

**धोंड्या** : सुभानराव पाटील! काय झालं व असं लांब तोंड करून बसायला? काय कुनी—?

**सुभाना :** (त्याची खोंच लक्षांत घेऊन उतरल्या चेहऱ्यानेंच) व्हय. तू कुनिकडून आलास ?

**धोंड्या :** काकड्याच्या घराकुंडं—का ?

**सुभाना :** न्हाई, आताच कोपरगावाहून आलो मीं, तवा तुझ्या मेव्हण्याचा सांगावा...लई वाईट झालं. इचार करीत बसलो. तुझी हाक कानावर आली— मनलं कसं सांगावं, बसलो खाली मान घालून. पन ही आसं कसं झालं रं धोंड्या ?

**धोंड्या :** मंजी तिकडं कुनी चचलं मनता व्हय ? बर झालं. कटकट गेली. ( बसतो. ) काडा बिडी. ( एवढ्यांत धर्मा येतो. )

**सुभाना** : धर्मा, चिक्कन मातीवर पाय पडला तर पाय घसरतो, पन् मानसाची जीभ रं कशी घसरती ? ( धोंड्याला बिडी देतो. )

**धर्मा** : ( सहजपणें ) जिभेवर साखर पडली मंजी. ( बसतो. )

**धोंड्या :** ( नकारार्थी मान हालवीत आपल्याच तंद्रींत ) अंहं. आपल्याला नाही पटत. ( विडीचा झुरका मारून ) मंजी बगा पाटिल. डोस्क्यावर दिवस आला की जिभीला कोरड पडाय लागती. अन् मग आत खेचली जायला लागली की तिची तोंडांत न्हायची धडपड सुरू होती. मग कुठला आला इचार ?

बेभानपनं ती चालती. बेफिकीरपनं बी ती वागती अन् तशा तिच्या वागनुकी-कडं बगून कुनी काइ बोलतं, कुनी काइ बोलतं. उचलत्यात जीभ लावत्यात टाळयाला. चालायचंच. बरं पन कोन चचलं मनलात कोपरगावला ?

**सुभाना** : ( विचार करून ) हं. खरंय तुझं धोंडया. भामटे, भडवे; चोर, संन्यासी, ऐतखाऊ, कुऱ्हाडीचे दांडे आसली सगळी मानसं आपल्या धंद्याचं मोटंपन सांगाय लागली की आसंच गिन्यान भरकटत सुटत्यात झालं. हाय काय न् न्हाइ काय. काय धर्मा ?

**धर्मा** : खरंय. बरं पन कोपरगावला कोन मेलं मनतोस ?

**सुभाना** : हां हां हां ( धोंडयास ) तुझ्या म्हेवन्याचं गाडाव रं ?

**धोंड्या** : मग मातर लई वंगाळ झालं. मानुस मरावं पन गाडाव मरुनी बघा.

**धर्मा** : ऑ ?

**धोंड्या** : हं. खरंय. अवं आजच्या जमान्यांत जीव जीवाला भार होतो. गाडवाच्या पाटीवर जीव टाकतां येतो. दमडीचा खर्च न्हाई न् धरणीला भार न्हाई.

**सुभान** : मला वाटलंच होतं. गाडवाचं मरान तू जिवाला लावून घेचील मनं. अन् मनूनच मी तुला पैल्यांदी सागत न्हवतो बघ.

**धर्मा** : धोंड्या, मोठ्या बेफिकीर छातीचा मानुस हायस तू. गाडवाचं सोड पन पानसा एकी तुला काई वाटंत न्हाई रं ?

**धोंड्या** : ( तेवढ्याच बेफिकीरपणें ) हंः पदरातबी न्हाई न् जनांत बी न्हाई, फिकीर निस्तीच जिवाला खाई. अन कुनाची फिकीर करून मला वं काय मिळनार ? जग जर इतकं चांगलं असतं तर...( विकट हंसतो. ) थोरलं धनी, जनामावशी ह्यांच्या चांगुलपनाला फळ आलं; बघा ह्यो त्यांचा अवकळा आला वाडा. धाकटया धन्यांचा चांगुलपणा जेलात जाऊन फळाला आला. ( सुस्कारा सोडून ) जाऊं द्या झालं. पन कुटं हायत वं सुभान पाटील ते ? धाकलं धनी ?

**सुभाना** : आरं झेलांतच. येरवडयाला हायत मनं. कवा सोडत्याल कुनाला ठावं ! पन नेमानं पत्र तरीं धाडतोय का त्यो. चांगुलपनाचं फळ ! खरंय् तुझं मननं. पर कायरं येय् चांगल्याच्या, आलिकडं कंधि न्हाई ती पुनवंकडं आवस कां फिरकलीरं ? कां आलासरं मावशीकडं ? कसल्या कामगिरीवर धाडलंय रावसाय्बानी तुला ?

**धोंड्या** : छा छा छा छा ! मला व कसली आलीय् कामगिरी ? धाकट्या धन्यांचा काई पत्याच कळंना, झेलात ठेवून ठेवून तरी किती दिवस ठेवनार ?

सरकारी काम मंजी काई कायदे कानू आसत्यालच की. त्यानी काय खून बिन केलाय ? म्हुन इचारतो, सुटले बिटले तर कदी सुटत्याल मन.

**सुभाना** : धोंड्या, त्यांतलं तुला जितकं ठावं तितकंच आमाला बि ठावं. पन बरंच येड घेऊन पेडगांवाला जाता येतं कीरं तुला. अं ! तू मावशीकडं आलास ती चंदाचं इचारायला का काई कामानं आलास ?

**धोंड्या** : (वरमून) हॅ हॅ हॅ हॅ ! त्येच सांगतोय न्हवं. दिवस लई वाईट आले वो. घरात धड चिरगूट तर न्हाईच पन सांच्याला दानंबी न्हाईत. होती दोन दिवस कोरडीच भाकर खाल्ली, मीठ बी न्हवतं न् मिरच्याबी न्हवल्या. आता मनलं इचकावं तरी दात कुना कुनापाशी ? अन हाय तरी कोन असा हारीचा लाल ? बरं का पाटील, तुमि काइबी मना, पन थोरलं धनी गेल्यापासनं समद्या गावालाच आवकळा आलीय. थोरलं धनी होतं—ह्या दारावरून वाटंचा वाटसरू बी उपाशी गेला न्हाई. पन आज...पुना मनलं. लक्षुमी तीच, आदार आसरान् गावकऱ्याची सावली बी तीच. जनामावशी पायाजवळ आल्या दुस्मानालाबी उपाशी धाडायची न्हाई. तवा......

**सुभाना** : तू काय बि मन धोंड्या, मावशीचा सभावच लई इचितर. साप पायागत उपाशी आला तरिबि त्येला हिंमतीपरमानं पोटभर दूध पाजील पन त्यानं जातीवर जाऊन फना काडलीरं काढली कीं लागलीच चपली घेऊन त्याचं दांत मोजाय. ( सहजपणें ) एकाकाचा सभावगुनच असतो मना. पन धोंड्या, ही हाय तेवढी गांवकऱ्यांचीं सावलीबी पुसाया निगालेलं कडू बेनं गांवात काय कमी हायतीरं ? अन् सारुळकरांच्या साखरंच्या पान्यानं त्येची वाढ बि काय झपाट्यानं होतीया मनतोस, आरंऽआरंऽऽआरंऽऽआरं. काई इचारू नगस. अन् धोंड्या, त्येच्याच मुळं तिच्या ह्या कुरनाचं माजल्या गुराढोरांनं अवकाळी खाऊन तीन तेरा झाल्यात. ताटातली आर्धी भाकर बि तिनं तुला दिली असती...पन...जाऊं दे झालं. ही घे विडी. नसंलच तुझ्याजवळ. ( धोंड्या विडी घेऊन कानांत ठेवून उठत )

**धोंड्या** : ( उसासा टाकून ) बरंय पाटील, चलतो. बगतो कुठ काई घावलं तर. ( जातो. )

**धर्मा** : ( सुभानास ) जरा बस आसंच सुभानदादा. आलोच मी भाईर जरा पोरीला बघून. ( धोंड्याच्या मागोमाग जातो. सुभाना विचार करीत बसलेला

असतो. एवढ्यांत धर्मा परत येऊन त्याच्या शेजारीं बसतो. दोघेहि विचारमग्न असतात. आधीं कुणी बोलावं हा दोघां पुढेंहि प्रश्न असतो. काय बोलावं, कसं बोलावं तेंही सुचत नाहीं कुणाला. धर्मा सुरवात करतो.)

**धर्मा** : हं--काय दादा ?

**सुभाना** : काय ?

**धर्मा** : ( न सुचून ) काय न्हाई.

**सुभाना** : ( तंद्रींतच ) मंजी हाय' तर ?

**धर्मा** : ( त्याचा रोख न कळल्यामुळें ) मंजी ?

**सुभाना** : जीव ! जीव रं धर्मा ! बोलतोय न्हवं का ? आजून निघतोय कुडीतून आवाज. आज 'हाय न्हाई' एवढं तरी बोलतोय न्हवं आपुन ? उद्या ती बी... पन मंजी हायच न्हवं.

**धर्मा** : हां ! तसं हावंतच की जीव धरून. खरंय. पन् खरं मंजी पक्कं घेरलंय सुभानदादा.

**सुभाना** : आं ! कुनी ?

**धर्मा** : मरीआईनं.

**सुभाना** : मरीआईनं ? आरं पन् तिला चपातिचा निवद, लिंबू, आंडं, कोंबडं, मेंढरू, बकरं लागायचं, लई लईच झालं न हुंदाडाच आला तर एखादा हल्या दिला की झालं. पन तिला ही जमीन् आन तुझ्या माझ्यासारखी मानसं कधीपासून लागाय लागली ?

**धर्मा** : ही नवी मरीआई अशी जरा जगाएगळीच हाय. हिला बसायला लागते जिमीन. ही जिमीन मिळवतांना जमिनीच्या पैल्या धन्याचं काय करायचं—काय होनार—यो उपाशी व्हानार का मरनार—ही नवी मरीआई त्याएकी कधींच इचार करीत न्हाई. जुनी मरीआई जिनकी निबर काळजाची तितकीच दयाळू बि होती आसं लोक मनत्यात. तिच्या कोपाला सिमा असायची. हिला दयान मायाच ठावं न्हाई. वावडं हाय हिला. पसंत पडली जमीन तिला मिळालीच फाईजी. अन हाडकं चगळल्यागत चगळाया मानसं फाईजीत. ही नवी मरीआई सरळ सरळ मानुस लै करून मारीतच न्हाई.

**सुभाना** : हं. ( निःश्वास सोडतो. )

**धर्मा** : काय ?

**सुभाना** : असंच आटवलं झालं पारध्याचं कारन. धाकटंपनी बगितलं होतं, आतां बंद केलंय सरकारनी ते.

**धर्मा** : ( बुचकळ्यांत पडून ) मंजी, काय मनायचंय तुला ?

**सुभाना** : आरं हे आपलं पारधी लोक हाईत न्हवं ?

**धर्मा** : बरं बरं, मग ?

**सुभाना** : ह्येच्या देवाचं बी आसंच कारन असतं. ह्येऽ भक्कम हाल्या घेत्यात. जाम बांधत्यात चौकून त्याला. अन् हालगी सुराच्या तालावर नाचायसाठीं समदे फेर धरत्यात. मग नाचत नाचतच सुरीनं भोसकायचं अन् तिथंच तोंड लावायचं. चाळनीं चाळणी करायची त्याच्या देहीची-पन एक घाव दोन तुकडं न्हाईत. हं: ! तसंच न्हाई रं हें ? गंमत हाय झालं.

**धर्मा** : हं: हे कारन आता चौकडंच सुरू हाय दादा.

**सुभाना** : पन् छट्. आपल्याला असं न्हाई मरायचं बाबा !

**धर्मा** : मंजी ?

**सुभाना** : ( विचार करून ) पन् कायरं धर्मा, हे मरान मरान मनत्यात त्ये कुनिकडच्या बाजूनं येईल येवडं तरी कळंल कारं ? तुझा काय अंदाज हाय ?

**धर्मा** : ( थोडें वैतागून ) अरं पन ती का इतकं ?

**सुभाना** : माझी एक हौस हायरं.

**धर्मा** : कसली ?

**सुभाना** : जाता जाता कमीत कमी, पायाच्या बोटागनीक एक तरी मिळावा रं मला—आखरीच्या लाथंला माझ्या.

**धर्मा** : एडा हायस.

**सुभाना** : होय ? झालोय खरं येडं.

**धर्मा** : मग हे एड घालवायचं का पोसायचं ?

**सुभाना** : अखरीची एकच, एकच ठेवून द्यावी न् मगच काडावं मनतो मी त्येला.

**धर्मा** : दादा. त्ये लाल बावटेवाले मनत्यात, तीबी जरा इचारान घे. हे काम लोकांच्या भक्कम एकीइना आटपायचं न्हाई.

**सुभाना** : ( तिरस्कारानें ) हं: एकी ! एकी ! हात धुवून पाटावर बसाय पुरता येळ न्हाई, मनं करा एकी. कोर्ट, कचेऱ्या, तारखा, दिवसच्या दिवस

कोर्टाच्या दारांत माशा मारीत बसावं लागतंय, तेवढ्यात बी एकाद्या गावकऱ्याला भेटायचा उशीर-झालीच त्याच्या इरुद्ध गावगुंडी सुरू. ( चिडून ) करा एकी ! ( छद्मी हंसून ) जमीन असून नसल्यात जमा, काम धंदा न्हाई, औषध पानी न्हाई, मरायबी लागलो तरी मनं करा एकी ! हंः हाय काय न् न्हाई काय. सोंग हाय झालं.

**धर्मा** : सुभान दादा, तुझ्यावर किती खटले झाले ?

**सुभाना** : ( बेफिकीरपणें ) रोज मडं त्याल कोन रडं !

**धर्मा** : चालू किती हायत ?

**सुभाना** : हायत चार पांच.

**धर्मा** : अन् एवढ्यातच......

**सुभाना** : ( उपरोधीकपणें ) तुझ्या गवऱ्या मसनात गेल्या. मन मन. ( स्वतःशीं ) खरंय.

**धर्मा** : सुभानदादा, असा चिडतोस काय ? तुलान् मला चार दिवस जगायचं, कच्च्याबच्च्यास्नी जगवायचं, दिवस हे असं अन् जगायचं म्हनलं तर......

**सुभाना** : तर कुत्र्यावानीच, यांच्या हवाली जमनी करून; त्यांच्या कारखान्यांत शेतमजूर मनून, त्याची हांजी हांजी करून, कोरभर टुकडा खुशाल हातावर घेऊन; कारखानदाराच्या शेतबांधावर मार ऐटीत हुबा राहून; एकादी मिर्ची चोरून आणून भाकरीवर घेऊन. मोठ्या खुषीत ती भाकर खाऊन, झोकात वहात्या पाटाचं पानी पिऊन मिशीला पिळ देत देत, मालकाच्या मोटेपनाचं पवाडं गात गात, हासत नाचत खेळत जगायचं—आसंच न्हवं ? ( खवळल्या वाघागत धर्माकडे बघत ) हे तू बोलतोयस ?

**धर्मा** : ( तिनक्याच निर्धारानें ) व्हय, मनुनच' मनतो कि जिभेला अन् डोक्याला कासरा लाव, समदं नीट आधि ऐकून घे न् मग फाईजी तर थोबाडित हान. मी सखाराम न्हाई, मी तुझा धर्मा हाय. मला काई कळत न्हाई, धोंड्या आला-आनल्या गाठीचा आगलाव्या—हितं उगंच न्हाई आला. कोळयाच्या जाळ्यानला मोक्याचा मनी-काय मी तू ओळखत न्हाई त्याला ? म्हैना पंधरवड्यांत आनि एखादं कोडं वाढून येइल बि. पन भागतंय का असं चिडून अन् डोस्क्यात राख घालून घेऊन ? अं ?

**सुभाना** : ( तंद्रींतच ) ए न्हाईतर चल जाऊ डांगमच्या डोंगरात, करू वाटमारी. हे मोट्टे मोट्टे बकरे सारे, गाठू आपुन आडरानात.

**धर्मा** : हं : काईतरीच बोलतोयस तू. कुनाला लुटायचं न् मारायचंरं तिथं ? ह्यो तुझा कारखान्याचा शेट–ह्यो येनार व्हय तिथं ? पाठीला लाख दोन लाखाचं गाठूडं घेऊन मजल दर मजल करीत—' यारं वाटमाऱ्यानूं मला लुटान् मारा ' मनत. आरं, त्याच्या साध्या कारकुनालाबी कारखान्यांतल्या कारखान्यांत हिंडायचं मनलं तरी बि लबरी टायराची बैलगाडी लागते. अन् हे लोक येत्याल तिकडं डोंगरांत मरायला ? आपुन वाटमारीला जायचं, एकाद्या लंगुट्याचं उपाशी कुटुंब गाटायचं, काय आसंल नसंल ते दे न्हाईतर मारतो मनायचं, अन् त्याला जिवानिशी मारून चार शेंगाची टरफलं बी हातीं न्हाई लागायची. झाली वाटमारी, न्हाई का ?

**सुभाना** : ( वैतागून ) आरं पन मग मननं तरी काय तुझं ?

**धर्मा** : ( विडी देत ) तुझ्या लाथाबुक्यास्नी माझी आडकाटी न्हाई दादा. द्यायची तर तू, मी समद्यानि मिळून एकच अशी पेकाटात ठेवून द्यायची की त्या एका लाथंत ही सत्रा गाडवं, पंधरा रेडं अन् त्यांचा राजेपना हे समदंच्या समदं त्या एका ठोकरीसंगं उडवून लावायचं सारं. अन् ती काई आवघड न्हाई तसं. रशियात झालंय तसं. अन् मनुनच आता तुझ्या माझ्या सारख्यांनीं जिवात जीव असेपतुर तोंड उघडं ठेवलं फाईजी. अन् हाताला हात लावले फाईजीत. ह्येच्या पक्षीबी जास्त तरास होईल. तरी आपलं एकीचं काम करीतच न्हायलं फाईजी. ज्याला पोटभर मिळतंय त्यो कशाला पडंल अशा फंदात ? नागवा झाला तरी राख लावली न्हाई अंगाला, डोस्कं शाबूत ठेवलं, त्याचंच ही काम हाय. अन् आता जाऊन जाऊन जानार तरी काय, अं ? उजडंल तिथं उजडंल. दहाच्या इचारानं होईल ते चांगलंच होईल कंदीबी.

( एवढ्यांत 'मावशीऽमावशीऽ' हाक कानीं येते. )

**सुभाना** : कोन हायरं ? ( धर्मास ) हाक ओळखीची दिसतीय; आरं कोन हाय ?

**अबदुल** : ( प्रवेशून ) मी अबदुल भाई.

**सुभाना** : ( आश्चर्यानं ) आँ ! कोन, आबा !! आबदुलभाई !!! हेऽरे माझा गडी...ये ये ये. ( तिघे कडकडून भेटतात ) कसा हायस—बरा हायंस ? बस.

लक् झालं. लक् झालं. कवा सुटलास ? कुटं हुतास ?

**धर्मा :** दादा. जरा बसुं दे तरी निचीतीनं त्येला.

**सुभाना :** हं हं हं, पन् जेवला बिवला का न्हाई ? पन कुटं जेवनार तूं ? आन् जा धर्मा घराकून काई.

**अबदुल :** छा, छा, छा, आतावं मला काय कमी हाय ? आता मला काई तसं कमी न्हाई दादा.

**सुभाना :** ( आश्चर्यानें ) ऑ ?

**अबदुल :** आता मी कुटंबी गेलों तरी शेतकरी आपल्या भाकरीतनं चतकोर भाकर दीलच दील.

**सुभाना :** गिन्यान काय सांगाय लागलायस. जेवलाबिवला का न्हाई ? ( पाणी आणून त्याला देत ) हं. हे घे पानी. धू तोंड हात पाय. ( आबा पाणी घेऊन जात असतांना ) गब्रू आला माझा–आतां माझा चंदा तेवढा...... ( अबदुल चूळ भरून येतो. )

**अबदुल :** आतां समदं काई बराबर होईल पाटील.

**सुभाना :** ( निर्धारानं ) होइल. होईल. आरं धर्मा, जा मावशीला आन् जा बोलावून. आबा खरं सांग...पन् धर्मा, घेऊन ये जा हिकडंच आबाचं वाढून...

**अबदुल :** आवं न्हाई न्हाई, खरंच कोपरगांवाहून जेऊन आलोंय पाटील. आपले लाल बावट्याचे कॉम्रेड सावंत हैत न्हवं, त्येनीं नगं नगं मनता पोटभर घातलं बघा.

**सुभान :** बरं जा धर्मा, चा तरी आन जा तिकडून करून. आन् मावशीला बी दे धाडून. पन् ही आलीच मावशी. ( मावशी न्हाई, लक्ष्मीसह येते.) मावशे, घरी कोन आलंय सांग बरं ? ( अबदुल उठून मावशीच्या पायाकडे झेप घेतो.)

**जनामावशी :** माझा आबा ! आलास माझ्या राजा ? ( त्याची माया काढते. तो न्हाईच्या पायाला हात लावतो. )

**सुभाना :** ( लक्ष्मीस ) बाये. जा जा, चा करून आन जा आबासाठीं.

**लक्ष्मी :** बरंय. ( जाते. )

**जनामावशी :** आबा ! तुझी बायकापोरं बरी हायत बरं बाळ. परवाच सांगावा आला कुलसुमचा. तू गेलास, पडंल ती, मिळंल ती कामं हितंच करायची बिचारी. सावतर सुनेगत बगितलं न्हाई बरं तिच्याकडं. पन् म्होरं

तुझा सासरा आला. सांगितलं म्या समदं त्याला. कुलसुमचा उदासपना जावा मन् मग म्याच मनलं न्ह्या मनून तिला. सनवारीच सांगावा आला. बरी हाय संमदी मनं. हं. त्वा काई पत्तर बित्तर धाडलं न्हाई ? कुठं ठेवलं हुतं तुला ?

**अबदुल** : येरवड्याला ठेवलं हुतं. मी बी हिकडंच पत्र पाठविलं हुतं. एकबी पत्तर मिळालं न्हाई तुमाला ?

**जनामावशी** : न्हाई.

**अबदुल** : अन् चंदा दादाचं बी......

**धर्मा** : मंजी त्यो न् तू एकाच ठिकानीं होता ? ('घे विडी' म्हणून विडी देतो.)

**अबदुल** : तसा मी पैल्यांदा एगळ्याच यार्डात होतो. पन् समद्या राज-कैद्यांनीं मी बी त्यांच्या चळवळीतला हाय आसं सांगून, भांडून आपल्यातच घेतलं हुतं मला. चंदादादा न् मी एकाच ठिकानीं होतो.

**जनामावशी** : व्हय ? कसा हाय त्यो ?

**अबदुल** : बरा हाय. चांगला हाय. ( सारी माणसं विश्वासांतली आहेत हें पाहून ) सुटलाय आता झेलातून.

**जनामावशी** : माझं लेकरूं ? हिकडं वं का ईना माझा राजा ! आबा तू झेलात हुता न्हवं त्याच्याबर ? रुसलाय बिसलाय का त्यो आपल्या घरावरती ? इतकी कारं माया पातळ केली त्यानं ? पत्र पाठवून पाठवून दमले. एक दोन एळा सुभानला बि येरवड्याला पाठिवलं. भेट न्हाई, कां पत्तर न्हाई कित्ती गुनाचा माझा राजा. पन कारं त्यानं अशी पाट फिरवलिया घराकडं ? घरात रुपानं गुनानं सोन्याची खान अन् ह्यानं केलं आपल्या जिवाचं रान. मानूस चळवळीत गेला मंजी असाच होतो का रं बेफिकीर ? बिनकाळजाचा ? त्या समद्या चळवळ वाल्याच्या घरी त्यांची आई, भैन, मानसं अशीच आपआपल्या घरी कोकलंत असत्याल कारं ? अं ? कनाकनानं झिजून बापजाद्यानीं सोन्याचा संसार हुबा केला. आज मातीमोल झाला. अन् मीबी त्याची पर्वा करीत न्हाई. पन पोटचं एकुलतं एक पोर—नेत्राचं दीप हाताचं पाळणं करून गुलाबाच्या फुलावानी वाढिवलं. आज ती आई एका पत्राला महाग व्हावी ? कुनाला काय सागायचं !

**अबदुल** : मावशी, माझ्यावर इस्वास हाय तुमचा ?

**सुभाना** : सांग सांग आबा.

**अबदुल** : चंदाचं न् माझं एकबि पत्र मिळालं न्हाई तुमाला ?

**जनामावशी** : गावाला सांगतो आमि पतर येतं मनून.

**अबदुल** : मंजी पतरं सुद्धा घरापतुर पोचू दिलं न्हाई तर! ठीक हाय! काडुं कडता. ( चोहोकडे चौकसून ) मातर चंदाशदा सुटल्याचं सांगु नका कुनाला बी चुकूनसुद्धा. चुकून कुनाला दिसला तरी कुनी बोलायचं न्हाई त्येच्यासंगं.

**सुभाना** : म्हंजी ?......

**अबदुल** : काई न्हाई. तुमाला ठावं हाग—सध्याचं सरकार कामगार-शेतकऱ्याची बाजू घेऊन बोलणाऱ्या कुटल्याबी कार्यकर्त्याला बेधडक झेलात घालतंय. त्यामुळं उघड काम करायचं मंजी लई कटीन. मनून त्यो आता कामगार-शेतकऱ्यांत लपूनछपूनच काम करतोय. परसंग आला तर ( हळूच ) येईल न् भेटंल बी एखादी. पन...नेम न्हाई त्याचा. पन मी मनतो त्यानं तरी कशाला यावं घरी न् जीव धोक्यांत घालावा ?

**जनामावशी** : ( भरून येऊन ) आबा, हें तूं बोलतोस ?

**अबदुल** : होय आई! ( जाणूनबुजून ) होय आईच. व्हय. मी तुमचा आबाच बोलतोय. झेलात गेलों. शिकायला मिळालं. नवी दुनिया दिसली मला. तुमी जी पोराबाळाच्या सुखासाठीं हाडाचीं काडं करताय त्या सुखाचीच दुनिया हाय ती. तुमचा चंदा अन् आतां तुमचा आबाबी, त्या दुनियेसाठीं, न्यायासाठीं, जनतेसाठीं लढतोय. त्या जगांत ही गांवगुंडी न्हानार नाहीं. कारखाना न्हाईल पन् त्यो कारखाना शेतकऱ्याच्या जमिनी अन्यायानं हाडपनार न्हाई. कुनी कुनाला उपाशी मारनार न्हाई, तिथं बेकारी न्हाई, धनी न्हाई, कुनी कुनाचा चाकर न्हाई. वाटनीला येइल ते काम. पोटभर खा, सुखानं न्हा...आई, आता मीबी सबा घेनार. समदा शेतकरी कामगार, समदं जग...अन् त्येच्या रक्ताचा झेंडा..... चंदादादा हायच आपल्या पार्टीला.....

**धर्मा** : व्होय ? बरं झालं तू आला. धीर आला.

**सुभाना** : म चला. बोलवा गावकऱ्यास्नी, काय मावशी ?

**जनामावशी** : हं बोलवा. जा धर्मा, सोड चार पोरं. ( धर्मा जातो.) माझं तरी काय आतां ? तुमचं तेच माझं. माझ्या पोरीत—न्हाईत जरा जीव गुततो माझा. न्हाईतर मी तरी काय! यावं मरान तर खऱ्यासाठीच—काईतरी भलं करतां करतां. उजेड देता देताच जळून जावं दिव्यानं तेच खरं.

**न्हाई** : अन् का बरं आई आसं बोलता मग ? न्हाईनं परीक्षा दिली न्हाई म्हुन होय ? आई, न्हाई तुमच्याच खानीतलं नानं हाय न्हवं ? हीनकस ठरनार न्हाई ती.

**जनामावशी** : होय माझी माय. खरंय. पन्...माझ्या डोळ्याचं पारनं..... ( खिन्नपणें ) काई न्हाई. पन आबा, झेलात त्या मारामारीत माझ्या चंदाला काई लागलं बिगलं कां रं ?

**अबदुल** : हं. तसं लागलं होतं डोळ्याला बरंच. आता बरा हाय मावशी...( लोक येऊं लागतात. )

**जनामावशी** : कुलसुमला कधी आनायचं ?

**अबदुल** : आनू मग, बघू. करू इचार, आता बरी हायत न्हवं सारी ?

( लक्ष्मी तांब्यांत चहा घेऊन येते. )

**जनामावशी** : व्हय सनवारीच म्हमद्या येऊन गेला. दे बाये, दे त्याला चा ( तो सर्वांना आग्रह करून चहा घेतो धर्मा येतो. )

**धर्मा** : आलो सोडून पोरं गावात. येत्याल आता गावकरी. ( बसतो. )

**अबदुल** : हं. हिकडं कसं हाय तुमचं ? सांगा पाटील, धर्मादादा.

**सुभाना** : हं. बरंच हाय मनायचं. आता लागंलच रांगंला तूं मनतोस त्या परमानं. सभंत तुला काय एकी एकी सांगायचं ते सांग. पन आबा, मला मातर एवढा गावकऱ्यांच्या जोडयांतला खिळा-सख्या बामनाला ठेचायची परवानगी फाईजी.

**अबदुल** : पाटील, ह्यो खिळा सिरमंतांच्या चाभारानीच ह्या जोडयाच्या शिवनीत ठोकलाय. एखाद्या मानसाच्या ठोकरीसंग तुटायला त्यो शिवताना काई त्या चांभाराला एड लागलं न्हवतं. व्हायला फाईजी ती समदं करायचं; अन् होईल बी पन् सारं इचारानं. काय पटतंय ?

**सुभाना** : हं ऽ बगुतर खरं.

**अबदुल** : धोंड्या कसा हाय ?

**धर्मा** : कुत्र्याचं शेंपूट कसं असतं ?

**अबदुल** : बरं. बरं का भाबी, चंदा तुमची लई आटवन काडायचा आक्षी.

**न्हाई** : (थोडं फुरंगटून) आई, बगा बरं...बगा बरं का अबदुलभाई मग...

**अबदुल** : न्हाई खरंच. तुमच्या गळ्या शप्पथ व भाबी. अन् मग आपल्या आपूनच मनायचा बरं कां मावशी, "अरे, आईचं तर सोडच पन् ती

सुद्धां आल्या परसागाला हिंमतीनं तोंड दिल्या बगार न्हायची नाहीं." हं मनुन होट दुमडून सभावागत ताठ मानेला ह्यो हिसडा मारायचा......(हंसतो.) काय भाबी ?

**न्हाई** : (थोडं वेडावत) हं ऽ बरं बरं, अन् तुमचं....

**अबदुल** : हं हं इचाराकीं तिकडनं (जीभ चावतो.) चंदादादा भेटल्यावर. देईल की त्यो बी कोलीत तुमच्या हातांत.

**धर्मा** : मंजी; झेलात बरीच गंमत चालायची तर ! न्हाई का ?

**अबदुल** : हं. आवं चंदा दादा झेलात काय एक एक गानं न् लावनीबी जोडायचा मन्ताव ! अन् मनायचं यायचं की मग माझ्या वरतीच. हं. व्हय की, त्यानं एक लावनी जोडली अन् भाबीला म्होरं करून समदं गावचं शिवारच्या शिवार हुबं केलं कीं वो.

**धर्मा** : आरं मग लोक जमल्यात तंवर मन की. काय सुभान दादा ?

**सुभाना** : हं मन मन. ऐकु दे जरा त्याची लावनी भाबीला बी. काय भाबी ?

**सगळेजण** : मना मना.

**अबदुल** : अशीच घराकडची आटवन आली त्याला बरंका पाटील. अन् मग...( अबदुल लावणी म्हणतो. )

—लावणी—

**सळकन् नागिणी वानि, येउन बनातुनि पळ साधुनीं**
**नयनानीं सोडिला बाण-सोडिला बाण—**
**जरि हाती भरालि गोफण, होती गुंज्यानं तुझ्या करणीनं**
**भारला जाऊन झालो हैराण-झालो हैराण— ॥ धृ ॥**

**अप्सरा उतरली स्वर्गावरची खरी**
**जणु चम्‌चम् चमकती मोती कपाळावरी**
**झळळ्ळा झळकते लाल कुकाची चिरी**
**असं ध्यान पाहुनि, भान हरपुनी, तान-**
**भूक पन मेली-भूक पन मेली.**

**माझि दुनिया राणि रंगली, मती गुंगली आज पळ आली**
**तुझ्या पायदळी टाकिली मान-साजणे सोडिला बाण.**
**पायदळी टाकिली मान ॥ १ ॥**

फडकतो शालु तुझा हिरवा हिरवा गारं
लकलका तळपत तुझी तनू तलवार
उफनत सोडुनि गोड धुंदिचं वारं
नोक झोक सारं काई न्यारं, नवतिची नार सुगीचं दार
फाटच्यापारं आलि ओलांडुन-आलि ओलांडुन.
झपाटलो पुरा जाऊन, प्राण मुठितून, उभा घेऊन
चरणि ठेविलें घेइ गं दान-साजणें थ'र होऊन
घेई गं दान ॥२॥

**अबदुल** : काय भाबी, कशी काय हाय लावनी ?

**न्हाई** : (तसंच चिडवीत) व्हय ! व्हय ! मानसं याया लागलीत बरं कां ?

**अबदुल** : व्हय खंरच की. ('या. या.' करीत अबदुल सर्वांशी भेटतो. एकमेक एकमेकाना प्रश्न विचारतात. बरेचसे गावकरी जमलेले पाहून—) गांवकरी जमले वाटतं ? (गांवकऱ्यांत कुजबूज सुरू होते, 'अरे तो आमका आला न्हाई, तो तमका आला न्हाई—')

**एक गांवकरी** : येत्याल, येत्यातच न्हवं. (एका मुलास) अरे ए नागा पोरा, जरा गानं तरी मन चार गांवकरी येई पतुर.

**सगळे गांवकरी** : हं हं म्हनारं. म्हनारं पोरानूं. ऊठरं नामू, आनुसया ऊठ. (नागा, नामू, शिदू, अनुसया गाणें म्हणतात.)

## गाणें [ सांघिक ]

शेतकऱ्यानों यारे घ्या एकीची हातीं मशगल
कामगार या सारे उधळा वरती रक्त गुलाल. ॥
तुम्ही उभारुन जग हे अवघें, रहावयाला घरटें; न मिळे
तुम्ही पुरवतां अन्न वस्त्र परि, तुम्हास नाही पुरते; कधिंही
तुम्ही काढिले कष्ट, पोसले दुष्ट, न्याय कुठलारे; यारे यारे यारे यारे ॥
पोसलीत कां बांडगुळें ही, लाथा खाण्यासाठीं; केवळ
नाहीं हो जगण्यांत राम, रडगाणे गाण्यासाठीं; हें रडगाणें
आज उठा उंचाउनि माना, नवीन गाना गारे; यारे यारे यारे यारे ॥

दुनियेमधली फौज आपुली, मजूर शेतकऱ्यांची; सजली
उतरली ही मैदानि ना कुणा, छाती अडवायाची; ना कुणा
हातात घालुनि हात, मिसळुनी त्यांत जाऊं या यारे, यारे यारे यारे ॥
जगामधिल पिळले जाणारे, सर्व साथिला घेऊं: यारे सर्व
शक्ति आघाडीवर लढणाऱ्या, हांक तयांना देऊं; एकिची हांक
माणुसकीनें जगण्यासाठीं लढून विजयी व्हारे यारे यारे यारे यारे ॥

**सुभाना** : बसा बसा रे बसून घ्यारे. (लोक बसून घेतात.) काय धर्मा, करायचं सुरू ? आले समदे ? काय अबदुलभाई ? (अबदुल त्याच्या कानाला लागतो.)

**धर्मा** : हं, होऊं द्या—करा सुरू.

**सुभाना** : गावकरी मंडळी, ह्येच्या पायी आपुन जमावं मनलं की आता जो काई आपल्या गावकऱ्यावर ह्यो डोंगर कोसळाय लागलाय त्याचं काय करावं ? दहाच्या इचारानं झाल्या बगार हे सरनार न्हाई असंच आता वाटाय लागलंय. तवा मनलं ह्येच्यावर गावकऱ्यांचं काय मननं हाय ती बगावं. काय आबा ?

**अबदुल** : काय गावकरी मंडळी, काय इचार हाय आपला ? (एका म्हाताऱ्यास) काय भगवानबाबा, काय मननं हाय आपलं ?

**एक म्हातारा गांवकरी** : काय असायचंय ? पैलंच रडं, आता रडायची ताकत न्हायली न्हाई एवढंच.

**दुसरा म्हातारा** : काई दिसाम्हागं, तू झेलात होता. गावानी पंच पाटिवलं ह्या काँगरीसीच्या मंत्र्याकडं, अन् त्या मंत्र्यानीं गमती गमतीच्या गोष्टी सांगितल्या झालं. करमनुक.

**अबदुल** : काय मनलं होतं त्यांनीं ?

**दु० म्हातारा** : आमी मनलं की पाटाच्या पान्यानं समदी जमीन नासाय लागलीय. काँगरिसीचं मंत्री मनल्यात डकर्त पानी फुकटात मिळतंय पिकवाकी भात त्या जिमनीत—पैकाच पैका मिळंल. समदी जमीन लव्हाळ्यानं खाल्लीय आमची. मनल तर ते मनल्यात टाका घोड्याला. त्योबि फायदाच हाय तुमचा. सांग अबदुल भाई, आता हसावं का रडावं ? उपाळ जमनीत भात पिकवायचीन् घोड्याला लव्हाळा खाया लावायची करामत नवी हाय का न्हाई ही ? अं ? भक्त दामाजींत बेदरचा बादशा होता त्योबि असंच मनायचा—रोटीं न मिलती तो घी शक्कर खाव. गंमत हाय झालं.

**एक गांवकरी** : समद्या गावात ओल झालीय, लोनाव्यामुळं वरल्या आळीच्या तुकाराम शियाचा धाबा बसला.

**गांवकरी** : माझ्या घरीं चूल इस्तू धरि नाय. (अबदुल धर्माशी कुजबुजतो.)

**गांवकरी** : माझ्या सान्या जमनीत लव्हाळा, न सान्या घराला लोनावा लागलाय. आतां घोगडं टाकून आडवं पडावं मनलं तर कुठं पडावं उमगानाय ?

**गांवकरी** : तुला ठावं न्हाई अबदुलभाई, आपलं हे राजुरी--जरा जाऊन बघ त्या गावात. कुनीतरी मनलं होतं की लढाई झाली न बॉम गावावर पडले तर आसं होतं मनं. आवं समदं गावच्या गाव बसलंय. मानुस तर सोडा, चिट्र पाखरू गावात न्हाई, आवं हाय काय ? उंदीरगाव, गोदंवनी, ममदापूर, कोहकी, बरामनगाव ह्यांची बी काय वाट लागतीय कुनाला ठावं. समद्या गावात चिकुल.

**गांवकरी** : गेल्या पावसाळयात आपल्या गावाच्या समद्या वाटा बंद झाल्या, पर गावकऱ्यानी त्येच्यावर तिथल्या तिथं चुळबुळ चुळबुळ केली न् पडले गपा दहीगाव, भोजडं, पिंपळवाडी, महासहा महिने सारे रस्तेच बंद. माझ्या जमनीत वाव पिकानाय. पार उपाळलीय. चराची मागनी करून जिव रडकुंडील. आलाय.

**गांवकरी** : हं: ही तर हमीशाचं झालंय, माझं शिंगरू परवा नागमोडीच्या लवनात रुतून बसलं......

**गांवकरी** : ( संतापान ) आज बराबर दहा दिवस झालं. माझी कपिला एकुलती एक दुभती गाय चिखलात रुतली. ह्या ह्या डोळयानी बगावं लागलं. अन् आजून बी गावकरी बगत्यात--माझ्या कपिलेला घारी, गिधाडं फाडफाडून खात्यात ती.

**गांवकरी** : आवं माशातर बगतायच अधारांतून भाईर तोंड काढूं देत न्हाईत.

**गांवकरी** : अन त्येच्या मुळंच बारा म्हैने तेरा काळ पटकी दारांत धरनं देऊन बसलीया. ( धोंड्या येतो. त्याच्याकडे सुभाना अबदुलची दृष्टि जाते. )

**गांवकरी** : ( हाताची खरूज दाखवीत ) ह्ये बगितलं हात अन माझा समदा धेई, ह्या बसत्या गांवकऱ्यांत कुनाच्या घरी खरूज न्हाई उठून सांगावं ! कुनाचं प्वॉर ढेबरं व्हाया लागलंय तर, कुनाच्या हातापायान्या काड्या व्हाया लागल्यात. इक खाया पैसा न्हाई, दवापानी कुठून करायचं ? अं ?

**गांवकरी** : ह्या कंपनीचा रोग तर पुरा भवलाय वं आमाला. उसाच्या लागवडीसाठीं माझी सोन्यावानी जमीन कंपनीनं खडानं घेतली अन् आज तिथं बंगले उठवायला लागलेत. कायदा पडलाय झिंगून.

**गांवकरी** : आमच्या जमनी एकरी दहा रुपये खंडानं घेतल्या, आज म्हागाई मी मनतीया. पैसुद्धा जास्त मिळत न्हाई. आज एकरी खंड चाळीस-रुपये झालाय. अन् आमची मातर दहा रुपयावर बोळवन होतीया.

**गांवकरी** : मजुरी कराया गेलं तर अंगात ताकत ऱ्हाईली न्हाई. त्यातबी कराया गेलं तर मिळत न्हाई. अन् त्यात काम मिळालं तर मजुरीचा भाव चार सा आने. घ्या करा काम. अन् वरती फडाफडा बोलनी न् शिव्याचा पाऊस. काळा बाजार, म्हागाई....अन् ह्या गांवगुंडीचा चटका, हितं बसल्या कुना गांवकऱ्याला बसला न्हाई—सागावं उठून.

**गांवकरी** : आन् ही जनामावशीच्या वाड्याची आवकळा. बगा जरा ह्या वागणीकडं बी बगा. सोन्यानान्यानं मडिवल्या अंगावर थंडीतापाएगळं काई दिसत न्हाई.

**गांवकरी** : अन् पट्टीसाटी गावकऱ्याच्या मानगुटीवर बसलेला रोग तर...

**गांवकरी** : पैशाचं पीक न्हाई, म्हेनत बियानं फुकटांत गेलं. हे पुनः आवंदाची पट्टी तर द्या मनल्यातच पन म्हागच्या बाकीसाठी आनि दारांत बसत्यात. त्यात हे लेव्हीचं भूत...काय करायचं काय ?

**धर्मा** : बराबर हाय मननं...अन् आपुनबी जरा इचारानं...

**तरुण गांवकरी** : ( खवळून ) इचार ! इचार ! ! इचार ! ! ! धर्मादादा, तुमचं तरी कुटं ऱ्हाईलंय पैल्यावानीं—इचार करीत बसायला ?

**धर्मा** : मग बिन इचारानं कुठल्या कामात यश मिळतं ? मरान हाय आपल्या हातांत. पन तीच नको मनुन धडपड हाय न्हवं ही सारी ? आल्या प्रसंगाला टक्कर द्याया आपुन कंदीबी म्हागं बगनार न्हाई. पन् टक्कर द्यायचीच मनलं तरी हातात इळा हाय म्हुन गवताबर धान कापतो का आपून ? अं ? ( सुभाना उठतो. धोंड्याला खुणेनं बोलावून बाहेर घेऊन जातो. ) पावसाचा अदाज, जमिनीचा दम; पेरनीची येळ, पिकाची कीड, कोळपन कधीं करावं, खुरपन कधीं करावं; कापणी कधी करावी, म्हेनत—मशागत कशी करावी, बी कस धरावं, हें काय इचाराविना होतंय ? आपल्या हातून इचारानं काई होनारच न्हाई असं काई न्हाई. समदं होईल. आपुन करू ती. न्हेऊ आपल्या साऱ्या मागन्या घेऊन तालुक्याच्या कचेरीवरती मोर्चा.

**अबदुल** : गावकरी मंडळी, मोर्चा न्यायचा इचार तुमाला पटलंच. म्हागच्या एळी पंच निवडुन सरकारकडं धाडलं. आपली गारानीं, मागन्या केराच्या टिपाडांत पडल्या. आजूनबी सरकारकडं ह्या गावगुंडीला चेंचून काडाय पायी, आन आपल्या समद्या मागन्या मिळवायपाई पाऊल पुढं टाकलं फाइजी. ( सुभाना येतो. ) आपले दुस्मन निसते ह्ये गावातले गावगुंडच न्हाईत, तर आपल्या जमनी बिनापैशानी, फसवून हाडपनारे हे सावकार, कारखानदारबी हैती. अन त्यांच्या म्हागं ती सरकार. की जी आमच्या बोंकांडी जीव घेनी पट्टी अन लेव्ही लादतं. त्यांचं समदं कायदं अन शिपाई गांवगुंडीच्या न् ह्या जुलमी कारखानदारीच्या म्हागं हुबा न्हात्याती. हे समदे एका माळंचं मनी. एकाचं दुसरं भाऊबंद. एकच रोग. कुठं फुटकुळी, कुठं गांठ, कुठं पू एगएगळया जागी एगएगळं दिसतंय, पन रोग एकच. आपली समद्याची भरभक्कम एकी हीच त्याच्यावर रामबान दवा. एकच जालीम औषध, कामगार-शेतकरी एकी. कंपनीच्या कामगारास्नी संगं आनलं फाईजी. आपुन गांवा गांवातून परचाराला लागलं फाईजी. हितली साखर कामगार युनियन आपल्या पाठीला हुबा न्हाईलच. ती आपल्या परीनं काम करीत आलीयच, पन आता जोडीनं केलं फाईजी. मग बगू कसा कुनाचा डंगा जिरत न्हाई ती. कुनाची रग किती एळ टिकतीया ती. मी मी मननारे गेलेत वहात ह्या एकीमुळं. अन् आता आपला चंदा दादा बी ह्याच कामगार शेतकऱ्याच्या एकींत काम करतोय. आपल्याला रस्ता दावाया आपला चंदा दादा भक्कम हाय. ( शेतकऱ्यांना बरं वाटतं. ) त्येच्याच घरीं आपल्या कामाचा म्हुरुत होतोय. यस आपलं हाय. पुढच्या खेपी जास्तीत जास्त कामगार शेतकरी सभंला आनले फाईजेत.

" बोला शेतकऱ्यांच्या एकजुटीचा विजय असो. "

" कामगार शेतकरी एकजुटीचा विजय असो. "



## तिसऱ्या अंकांतील पात्रें

**जागा : तोच जनामावशीचा वाडा. अधिक उजाड**

**जनामावशी**—पुढें चालू
**म्हाई; लक्ष्मी**— ,,
**सुभाना**— ,,
**धर्मा**— ,,
**धोंड्या**— ,,
**जमनसाहेब** ,,
**चंद्रा**—तरुण शेतकरी, जनामावशीचा मुलगा.
**सावित्रा**—एक तरुण शेतकरीण.
**पप्पूशेठ; मंगूशेठ**—गांवातले सावकार
**चार ड्रेसमधले व चार सीव्हील ड्रेसमधले होमगार्ड, इन्स्पेक्टर, दोन पोलीस शिपाई**
**सखाराम कुलकर्णी**-पुढें चालू

**नागू, नामू, शिदू व १०-११ वर्षांचीं इतर चारपांच मुलें.**

# अंक तिसरा

[ जनामावशी थंडीतापानें आजारी असून ती पांघरूण घेऊन जोत्यावर आपल्या निजायच्या जागीं कण्हत पडलेली असते, एवढ्यांत नामू व शिदू हीं दोन मुलं येतात. ]

**नामू** : शिद्या, आरं अजून कुनीच आलं नाई कारं ?

**शिदू** : येत्याल हाळू हाळू, चल बसू तंवर आपुन हितंच. ए, पप्पूशेटचा टिक्कम काय म्हनत होतारं ?

**नामू** : मनत होता कीं तू माझ्यासंग बोलचील का, खेळचील का ? मी तुला आमच्या दुकानांतून खायला आणून देत जाईन. म्या म्हनलं हट् ! लावलं हाकलून. एय, तुझं समदं गानं पाठ झालं कारं ?

**शिदू** : हं. आन् तुझं ?

**नामू** : हं. माझं बी. ( मावशीच्या जवळ दोघेही बसतात. ) ए शिदू, आमाला का न्हाई, शाळंत राम्यानं उमान घातलं होतं बग. ( नागू येतो ) ये नागू, तू बी ऐक.

**नागू** : काय ?

**नामू** : उमान, बगु बरं कुना कुनाला येतं ते ?

**नागू, शिदू** : हं सांग.

**नामू** : एक शिकारी होता बरं का. त्यो निघाला शिकारीला; अन् एका झाडावर त्याला दहा राघू दिसले. त्यानं एक गोळी घातली कीं ठॉ मनून एक राघू टिप्पीऱ्यासंगं खालीं पडला. अन् त्या झाडावरच त्यानं पुनः पांच गोळ्या झाडल्या. तर सांगा बरं, त्यातलं किती खाली पडलं असत्याल ?

**नागू** : ह्या जुन्या उमानांत मजा न्हाई. ह्येचं उत्तर कुनीबी दीईल, पन् मी एक नवं उमान घालतो. कोन उत्तर देतोय बगूं बरं.

**नामू** : ( थोडंस फुरगटून ) पन माझं उमान ?

**नागू** : आरं तेच हाय ही—पन जरा डोसक्याचं काम हाय.

**नामू, शिदू** : हं सांग.

**नागू** : एक दहा शिपायांची फलटन, एका खेड्यात गेली. त्या परत्येकाजवळ होत्या पाच पाच गोळ्या न् एक एक बंदुक. मग त्यांनीं रोखल्या शेतकऱ्यावर

बंदुका. सरकार मागतं तितकी लेवी शेतकरी देत न्हाई म्हुन. झाडल्या त्यांच्यावर गोळ्या. गोळ्या तर समूद्या उडाल्या. आता सांगा त्या समद्या पन्नास गोळ्यांनीं किती शेतकरी पडले असत्याली ?

**शिदू :** सरकारचं मननं हाय की गोळी वाया जाऊ नी. मनून एक्या गोळीला एक शेतकरी तरी मेलाच फाईजी.

**जनामावशी :** ( तापांत बडबडते ) गोळी घालत्यात मेले; या मनावं गोळ्या घालाया. जमीन आकूर कराया. या. न्हाई, खा तू दोन घास निचीतीनं. ( मुलें आश्चर्यानें मावशीजवळ येतात. ) जमीन आकूर करत्यात, त्या जनाचं मुंडकं शेतांत तुटून पडंल. तंवर जमीन आकूर होनार न्हाई. हात लावत्यात माझ्या जमनीला, खुब्यापासून हात काडीन. कुठंय माझा इळा ? ( सारीं मुलें गर्भगळीत होतात. हळू हळू मुलें येत असतातच. )

**नागू :** ( थोडयाशा धिटाईनं पण भीतभीतच मावशीजवळ येऊन ) मावशीऽमावशीऽ

**जनामावशी :** न्हाई, तू जेऊन घे, सोड सुभान, सोड मला. समूदं बराबर करते मी; सोड.

**नागू :** ( आणि थोडं धिटाईनं. अंगाला हात लावीत. ) मावशीऽमावशीऽ

**जनामावशी :** ( त्वेषानं ) सोडताय् का आलंय तुमालाबी. मला तुमच्या बानं बी कधीं आडिवलं नसतं अशा एळीं. मला तुमच्यापुढं धडक घ्यावी लागंल. रक्ताचा सडा पडंल हितं तुमच्या मोरं. सोडा. बगते मी. जमीन घेत्यात; ल्हेवी न्हेत्यात. हालकट मेले. ( न्हाई येते. हातांतली पाटी त्वेषानें उजव्या बाजूला फेंकते. डोक्यावरची चुंबळ ही फेकते. तिच्या मागोमाग त्याच अवतारांत लक्ष्मीही येते. ती ही पाटी ठेवते व चुंबळ घेऊन घेऊन तिच्या मागोमाग येते.)

**न्हाई :** हालकट मेले. अंगाला हात लावाय पतूर मजल ! ठावं न्हाई जना मावशीची सून हाय मी ( नागा धावत जाऊन तिला गप्प करतो. न्हाई, लक्ष्मी मावशीजवळ येतात. न्हाई मावशीचा ताप बघत असतांना. ) आईऽ.

**जनामावशी :** सोडा मला. न्हाई जेव तू कुठाय माझा इळा ? जमीन आकूर करत्यात मेले; ल्हेवी....

**न्हाई :** ( थोडी घाबरून ) आईऽआई, जरा बघा माझ्याकडं आई. ( जनामावशीला हालवते. )

**जनामावशी :** ( थोडे डोळे उघडून ) ऑ कोन ?...माझी ऱ्हाई...ऑ...
बाये...ये बस...( ऱ्हाईस ) तू गेलीस...अंग मोडून आलं...आतां बरं
हाय...तू कंदी आत्ता आलीस ?

**ऱ्हाई :** ( चेहऱ्यावर थोडी घबराट असते. ) होय आत्ताच आले. आई
तुमाला बरं हाय न्हवं ?

**जनामावशी :** व्हय बाळ ! आता बरंय. दोन तीन घंटे होऊन गेले.

**ऱ्हाई :** ( सांगू कां नको अशा स्थितींत हिंग्या करून सांगतेच ) आई म्या
आज सख्या बामनाला चेपलीखाली घेतला.

**जनामावशी :** (आश्चर्यानं) ऑ ? कोन कोन होतं ? काय झालं न् कशापायी ?

**ऱ्हाई :** मी, ह्या वन्स, साइत्रा अक्का तिघी जनीं गवऱ्या येचतांना लांब
लांब होतो जराशाक. तशा जवळच होतो, पन आडुशामुळं दिसत न्हवतो.
मला बगून बामन जवळ आला अन् लाडीगुडी कराय लागला. तिकडून झेलात
जानं झालं, तवापासून माझ्या म्हागं लागला होता मेला. आज त्यानं अंगाला
हात लावाय आधीच वन्संला न् अक्काला साद घातली न् घेतली चप्पल हातांत.
अन् तरवडाचा फोक घेऊन दोघीबी आल्या पळत. अन् घेतला मग चेपली
न् फोका खाली. मग मेला सुटला पळत. पळतानाबी पुना धडपडला; पुना
झोडपला मेल्याला. त्यो गेला तशा आमी घराकडं आलो. आई, तुमी रागं
ऱ्हाई भरनार न्हवं ? चपलांनी बडवून त्याला शिकिवलं म्या जनामावशीची
सून हाय मन.

**जनामावशी :** ( उत्साहानं ) माझी आई ! माझा राघू ! माझा चंदाच
हायंस तू. ये. ( गळ्यांत मिठी घालते व मुका घेते ऱ्हाईचा ) हानलं ? चांगलं
केलं. ( विश्वासानं ) लोळवू आता एक दिवस त्येची चामडी आपुन...अं,...

**ऱ्हाई :** आई, आता जरा उतार हाय न्हवं...चा करून देऊ जरासाक ?

**जनामावशी :** हं...राजा दे...दे जरासाक...बाये, (लक्ष्मीस) बसतीस ?
बस. पोरं जमलीं ?

**लक्ष्मी :** व्हय, जमल्याती. ( ऱ्हाई बिछाना नीट करते मावशीचा )

**जनामावशी :** आरं मग मना कीरं गानी. नागा, तालीम हाय न्हवं
आज ? अं ? नाचाबिचा.

**ऱ्हाई :** ( आंत जात ) पोरानू नाचा कीरं, मना की गानं, मना मनत्याती
तर. ( चहाच्या तयारीला लागते. मुलें, मुली नाचाच्या तयारीनें उभे रहातात.
एवढयांतच सुभाना येतो. त्याच्या हातांत वर्तमानपत्राचा अंक असतो. )

**सुभाना** : अरे येय, काय चालिवलाय रं धांगडधिंगा ? आँ ? मावशीला बरं न्हाई न्हवं ? तालीम करायचीच होती तर माझ्या घरीं करायची ? मावशीला तरास होईल. कळत न्हाई ?

**नागू** : मावशीच मनल्यात गा न् नाचा मनून.

**सुभाना** : हाँ हाँ हॉ, मग होउद्या, चालू द्या. ( मावशीकडे जातो. )

**लक्ष्मी** : ( सुभानास ) तू बस दादा हितं. मी जाते. ही काटकंकुटकं न् गंवऱ्या घरी ठेवून येते. ( लक्ष्मी टोपली घेते. )

**सुभाना** : हं. कसं हाय मावशी, बरं हाय न्हवं ? ( मावशी मानेनें होकार देते. ) बाये, ( लक्ष्मीस ) येता येता आबाचं जेवण वाढून आन् हिकडंच. ईलच आता त्यो. लई एळ झालीय. लवकर आन्.

**लक्ष्मी** : व्हय. ही आलेच घेऊन. ( जाते. )

**सुभान** : नाचारं नाचा पोरानू. मना गानं. ( हळू आवाजांत ) मावशी, तुला बरं न्हाई, चंदानं घरीं यावं मनतिस काय ? तसा येईल बी त्यो. पन...

**जनामावशी** : न्हाई. न्हाई. न्हाई. मला काय झालंय तसं ? मनारं मना पोरानू. गा न् नाचा.

( अबदुल येतो. मुलं थबकतात. अबदुल त्यांना "चालू द्या चालू द्या" म्हणतो. लपवून आणलेलं जाहिरातीचं पुडकं थोडासा कानोसा घेऊन न्हाईच्या हातांत देतो व तिला जपून ठेवण्याविषयीं खुणावतो. न्हाई तें घेऊन जाते. इतरांचं मुळींच लक्ष नाहीं असें पाहून न्हाई येतांच एक महत्त्वाचा लखोटा तिच्याकडे नाच ऐन रंगांत असतांना देतो. ती घरांत नेते. अबदुल नाच पहात बसतो. मुलें नाचतच गाणें म्हणूं लागतात. )

**गाणें** ( सांघीक )

**पुढं चला, पाय उचला–पुढं चला, पाय उचला**
**पाऊल पुढचा–पुढंच व्हायचा–वळुनबि बगायचं न्हाईरं**
**ठरलं पुढं चला ॥ धृ० ॥**

**आजवर वाहिलं–रक्ताचं पाट–शत्रूचं दात**
**घालुन् घशात–गड्या शाब्बासरं**
**काट्याकुट्यांतून–काढून वाट–अंधार दाट**
**चढून घाट–आलावरं–खरं आलावरं**

येशीवर आला-नवीनं हल्ला-करायचा ठरला
इच्चार दुसरा—अहं ठरलं—पुढं चला ॥ १ ॥

रोग साऱ्या गावाचा हेरलेला हाय—घेरलेला हाय
पन् धरायचा हाय-काय खरं का न्हाय ?
कालच चेचला गोऱ्याचा पाय-त्याला लपाय
यानं जागा दिलाय-खरंच हाय, मर्दा खरंच हाय
जिथं जिथं दिसला-दिसला की खेचला
रस्ता ह्यो आपला-सीधान् साधाच हाँ हाँ ठरलं ॥ २ ॥

मजूर, शेतकरी सरा म्होरं-गिरणीवर-कुणि—
शेतावर-मोर्चा धरा-राव मोर्चा धरा
नाकी नाकी सारी-रोखुन धरा-तैय्यार व्हा
बिगिन् करा, पंळं गमू नका-राव गमू नका
गनीमि कावा-तुमाला ठावा-आताच दावा
परसगं बाका हाय हाँ ठरलं—पुढं चला ॥ ३ ॥

पिळले गेले सारे-साथीला घ्या कंब्रा कसा
इसरूं नका-हो एकीनं या राव.
राज्याचा कारभार हिस्कून घ्या—शत्रू बघा
हुस्कून द्या-जल्दी करा-राव
गुंडांचा ताफा-निस्त्याच वाफा-तोंडाच्या तोफा
डागून भागायचं नाईरं-ठरलं-पुढं चला पाय उचला ॥ ४ ॥

**नागू** : कसा काय बसलाय नाच ? (न्हाई मावशीला चहा आणून देते. ती सर्वांना आग्रह करून घ्यायला लागते तों धर्मा येतो.)

**सुभाना** : काय मावशी, कसा वाटतोय ह्यो नाच, हे गानं ?

**जनामावशी** : हाय बरा...पन् ठरलं...पुढं चला मननाऱ्याचा पाय मोठ्या हुंबाडीनंच पुढं पडला फाईजी. गाताना...मानसाला असं दिसावं; वाटावं... गानारा गातागाताच जनुं दुस्मानावर तुटून पडतोय.

**सुभाना** : नागू, बग बरं मावशी काय मनतीय ती.

**नागू** : बरं हाय. आतां पुना बगा बरं का मावशी. ए समदे बराबर मना बरं कारं माझ्या संग. ( नागू गाणें म्हणतो त्याला सगळे साथ देतात. )

**गाणें**

लुटावया जीवन भांडार-द्यारे धडका फोडा दार ॥
जीवन वेतन आंत अडकलें-महागाईनें पुरे सडकलें
बेकारीचे लोट थडकले-पिळले जीवन आज भडकले
विचार अंतीं मार्ग एक या करावया दारावर वार
द्यारे धडका फोडा दार ॥ १ ॥

झिरझिरीत पडदा खादीचा-शुध्द स्वदेशी दारावरचा
बंद दार कुलपाच्यावरचा-नवा मार्ग तो फसवणुकीचा
कडिकुलपांतुन् फसवणुकींतुन-काय अपेक्षा फळफळणार
द्यारे धडका फोडा दार ॥ २ ॥

साम्राज्याच्या जुन्याच भिंती-नोकरशाही जुनीच नीती
जुने अडथळे तेच रक्षिती-आम्हां खेद ना तमा न भीती
किल्ल्या हिसकुन घ्यारे यारे-एकजुटीनें करा प्रहार
द्यारे धडका फोडा दार ॥ ३ ॥

मोडाया एकजूट आपुली-भंवती मर्कट सेना टपली
गर्जत ऱ्हा गर्जना आपुली-लोक क्रांतिची जगांत उठली
रणगाडे ठरतील निकामी-आतां पाजळा संप हत्यार
द्यारे धडका फोडा दार ॥ ४ ॥

ध्येय साधण्या धडक देऊं या-हवें रक्त तर रक्त देऊं या
गेलें सारें परत घेऊं या-हवें आहे तें सर्व मिळवुंया
खूण यशाची बॅरिकेडवर-रक्त ध्वजा ही फडफडणार
द्यारे धडका फोडा दार ॥ ५ ॥

**जनामावशी** : ह्येच्या पक्षीबी आपलं गानं चांगलं झालं फाईजी बाळ. धर्मा, सुभानानं काय आन्‌लंय बग बरं.

**धर्मा** : यारं पोरानूं बसा. ( सुभानानं आणलेला ' रामराज्याचा ' अंक घेत. ) ह्यो ' रामराज्य ' हाय मावशी.

**जनामावशी** : काय काय आलंय त्यांत ?

**धर्मा** : ( अंक पहात ) गंमत हाय ह्यांत. आपल्या कारखान्याच्या मालकाचा फ़ुट्ट हाय ह्यात. त्यानं उपास धरलाय मन.

**सुभाना** : ऑ, काय काय ल्हिवलंय त्यात ?

**धर्मा** : तेरा तारखीला कंपनीनं सुट्टी दिली हुती न्हवं ?

**सुभाना** : व्हय दिली हुती.

**धर्मा** : कशासाठी ?

**सुभाना** : मालकाला बरं न्हवतं मनं.

**धर्मा** : तसं न्हाई—ती सुट्टीच न्हवती.

**अबदुल** : मग ?

**धर्मा** : ह्यो पेपरवाला ल्हीतोय की " कामगारांनींही मालकाला उपासात आराम पडावा आणी त्याच्या राजहंसीला चारा मिळावा म्हणून हरताळ पाळला होता..अं..मालकाला सहा.. सहानुभी म्हणून...—"

**जनामावशी** : अं...ही राजहंसी न् ह्यो शेटचा उपास...काय भानगड कसली हायरं ही आबा ?

**अबदुल** : हां हा, हे आपलं साखर कारखान्याचा शेट हाय न्हवं. ती हाय त्या जीवदया मंडळाचा अध्यक्ष, मंजी बगा मुक्या जनावरावर दया करा, त्येस्नी मारूं नका असं सांगनाऱ्यांचा म्होरक्या. अमीरीका देशांत जल्माला येनारी एक राजहंसी हाय, ती हाय त्याच्या कबुतरखान्यांत. आपल्याकडचा चारा तिला चालत न्हाई.

**सुभाना** : मंजी सातासमुदरा पल्याडची मोती खानारी राजहंसी हाय मन की.

**अबदुल** : हं तसंच; अन् त्यो तिचा चारा तिला मिळत न्हाई, मन उपाशी न्हाऊन झुरनीला लागलीय ती. अन् तिचा उपास आपल्या शेटच्या डोळ्यानं बगवंना, त्या मुक्या जीवावरल्या संकटानं हैरान होऊन आपल्या शेटनं उपास सुरू केला, मोसंब्याचा रस अन् ती कसली साकर. कसली व धर्मा दादा ?

**धर्मा** : आरं ती गुलकोची साकर मनं. ह्या पलीकड काई सुद्धा घेत न्हाई. अन् हितं लिव्हलंय कीं....( थोडं आडखळत पेपर वाचतो ) " जीवदया मंडळाच्या आध्यक्षाचे प्राणांतिक उपोषण, दिवस सातवा, प्रकृती बरी, एक ही मुका जीव मी उपाशी मरू देणार नाहीं, दानशूर शेट सारोळकर यांची घोषणा. "

**जनामावशी** : हं : गंमत हाय झालं ! हिकडं बोलत्याचालत्या माणसाच्या तोंडातली साकर काढून सात वाटंची माती घालायूची अन् तिकडं राजहंसीला मोत्याचा चारा मिळत न्हाई मनुन जीव सोडायचा. चांगलं हाय.

**अबदुल** : मोसंबी न् त्या साखरंनी जीव जातो व्हय ? लाली येती लाली गालावर !

**सुभान** : मग चांगला हाय बाबा ह्यो उपास न् ही जीवदया ! आनि काय लिव्हलंय बग बरं धर्मा-बग.

**अबदुल** : आवं त्यांत थोडंच रामराज्यात चाललील्या ल्हेवीच्या जुलमाचं येनार ? परवाच्या दिशी नुंगण्यात घराघरांत शिरून हातातल्या भाकरी न् जात्यावरचे दाने न्हेले त्या होमगार्डानीं. ती कशाला येईल ह्यात ?

**सुभान** : आपल्या पाटलांच्या राजिनाम्याचं काई आलंय् का बग बरं.

**धर्मा** : ( पाहून ) हं हाय. ( वाचतो ) " कोपरगांव राहुरी तालुक्यांत बहिष्काराच्या चळवळीचा शिरकाव. सत्त्याऐंशी गावच्या पाटलांनीं आपल्या पाटीलकीचे राजीनामे दिले."

**सुभान** : व्हय कां ? लक्ष् !

**धर्मा** : कसलं लक्ष् ? कुटल्या कोपऱ्यात छापलीय् येवढीशी बातमी. सगळा त्या सारथी स्वामींच्या कौतुकानं भरलाय पेपर. ( पुनः वाचून ) हं ही बग, आपली आनी एक बातमी ( वाचीत ) " सुलतानपूर साखर कारखान्यांत संप-सर्वच्या सर्व कामगार संपावर " (इतक्यांत 'सुभानराव पाटील' ही हांक कानावर येते. )

**सुभानराव** : कोन हाय ? आत या. ( पप्पूशेट आंत येतो. )

**पप्पूशेट** : रामराम सुभानराव पाटील, धर्माजी पाटील रामराम.

**सुभान** : हं, काय पप्पूशेट, काय काम हाय ?

**पप्पूशेट** : अरे काय सुभानराव. अरे काय तुम्हां लोकांनी आम्हां गरिबावर जुलूम चालिवलाय् ?

**सुभाना** : तुम्हा गरीबावर ? जुलूम ?

**पप्पूशेट** : मी आजवर गावांत कुणाला त्रास दिलाय का ? सांगा. स्वभावानं मी किती गरीब आहें, हें पंचक्रोशीतलं पोरही सांगेल. अरे मी कुणाचं काय केलंय ते तुम्ही सगळे गांवकरी माझ्यावरती असा सूड उगवता आहांत ? काय गुन्हा केलाय मी तुमचा ?

**सुभाना** : एक जात सगळे सावकार जो गुना करत्यात, त्योच गुना हाय तुमचा, आसं गावकऱ्यांचं मनन हाय.

**पप्पूशेट** : पाटील, तुम्हीं गांवकऱ्यांचे मुखंड, म्हणून मी तुम्हाला गाऱ्हाणं सांगायला आलोंय. माझी बायको कधी नाहीं ती पाण्याला नदीवर जायला लागली. पाण्याचा हंडा उचलायला एक गांवकरीण तयार नाहीं ! दळण कांडण सुद्धां कुणि घेईनाय् ! तो मंगूशेट येतोयच आपली तक्रार घेऊन. पण ज्याच्यात तुम्हा लोकांचा फायदा आहे त्या मजुरीवरच तुम्ही लोक येईनात ? खुरपाया बाया येत नाहींत. यात नुकसानी कुणाची आहे ? आमची कां तुमची ? तुम्हीच सांगा बरं.

**सुभाना** : पप्पूशेट ! फायदा, तोटा चांगला कळाय लागलाय आता आमचा आमाला आजवर समदं कळायचं न् तेवढंच कळत न्हवतं. पानसुपारीवर कामं करून घ्यायची न ताडीमाडीवर गावात गावगुंडी करायची. कुटल्या गावकऱ्यांला ठावं न्हाई तुमची करनी ? अं ? तुमची जात मोटी हुशार ओ. सौताचा हात कदीं इटाळायचा न्हाई. मारायचा साप तर पावन्याकडूनच. करूनसवरून नामा निराळे. ( इतक्यांत मानकूशेट मंकड उर्फ मंगूशेट तरातरा येतात. ) या या मंगुशेट, तुमचं आनि काय ?

**मंगूशेट** : ( चिडूनच ) काय करायचं बाकी ठेवलंय तुमी ? अरे मारा मारा, जिवंत तरी मारा आमाला. कशासाठीरे हा छळवाद मांडलाय तुम्ही आमचा अं ? दुकानांतला माल कुणी घेईना तो घेईना, पण आमच्या पोराबाळांना दूध मिळेना. जनावरांना पाणी, वैरण काडी कुणी दावीना, अं ! अं ! अरे पोराटोरांनी न् मुक्या जनावरानी रे काय केलं तुमचं ? त्याचा तळतळाट् घेऊन तुम्ही काय करणार ? अशानं देव भलं करील होय तुमचं ! अं ?

**सुभाना** : मंगूशेठ, पुरान पुरं करा. लै पोराबाळांचा न मुक्या जनावरांचा उमाळा यायला लागलाय आज. लैय देवधरम आटवाय लागलाय तुमास्नी अं ?

बोलल्याचालल्या शेतकऱ्याच्या घरदार शेतींची राखरांगोळी केली. रातदिवस राबराबनाऱ्या मजुरांच्या पोटावर बिब्बे घातले. गावकऱ्यांच्या कपाळाचा टिळा; ताठली मान–ही जनामावशी, एकटी बगून गांवगुंडीनं तिच्या जिनगानीची खांडुळी खांडुळी करून तेचीं होळी केली. अन् आडमाप काळाबाजार करून सौताची घरं भरली. लाज न्हाई वाटंतरं पुना तुमाला गावकऱ्यास्नी तोंड दावाया ?

**मानकुशेट :** अरे अरे अरे ! काय किटाळ लावतायरे तुम्हीं ? अन् काय चालवलायरे सत्यानाश आमचा ? ऑ ? कायद्याबाहेर पाय टाकून एक कवडी तरी खाल्लीय कुणा शेतकऱ्याची मी ? अं ? भांडा, तुमच्या मनातून आसंल तर भांडा. हरकत नाहीं. पण भांडतांना, लढताना काहीं नीती नियम तरी पाळा ! सगळा पोरकटपणा ! येसवंता न्हाव्याला हजामतीसाठी बालावलं. अ ? तो आला अन् ही अर्धी हजामत करून ( डोक्यावरची पांढरी टोपी काढून भादरलेलं अर्ध डोकं दाखवून ) ' आतां आपल्यानं पुढं होत नाहीं ' सांगून तडक निघून गेला, हा काय न्याय झाला ? आजवर मला सगळे गांवकरी प्रेमानं मानकूशेठ ऐवजीं मंगूशेट म्हणून बोलवायचे. मंकड माझं आडनाव; कुणी तोंडावाटे उच्चारीत नव्हतं. अं ? पण आज घराबाहेर पडावं तर सारी गांवातली मुलं, पोरं ठोरं. " काळ्याबाजारवाला माकड, काळ्या तोंडाचा माकड " म्हणून माझ्या मागं लागतात. ही काय भांडणाची रीत झाली ? नीति झाली; सारा पोरकटपणा. अं ? भांडायचंय तर भांडा. आमच्यावर चालवा कायदा, होऊं द्या, खऱ्याला कसलं मरण ! कां हे...ऑ...

**सुभाना** : मंगूशेट, बरीच न्याय नीती न् देव, देवकार; अन् कायदेबि आटवाय लागलेत न्हाई का आज तुम्हाला ? कुनाला सांगाय लागलास रं नीतीन् न्यायाचं धडं ? अं ! ( तुच्छतेनं ) हंः ! ( स्वतःशीच ) मांजर उंदराला न्याय सांगाय लागलंय ! ( मंगूला ) काय घेऊन आला हुतास म्हराठ्यात येताना ? घरदार शेती आनली होती ? किती आनला हुतास पैका ? अं ? कुनाला बनिवतोस ? कायदा ! आजचे कायदे कुनासाठी हायत हे आजच्या शेतकऱ्याला कळत न्हाई व्हय ? आँ? कायदे ! ( रोखून जमिनीकडं पहात) त्या कायद्यानीच आमचं कंबरडं मोडलंय. ( मंगूकडे रोखून महात ) कायदा ! तुझ्या जातभाईंनीं, शेठसावकारांनीं, तुझ्या फायद्यासाठी केलेला कायदा. तुझ्या घरी

सोनं, माझ्या घराची माती करनारा कायदा ! हंः आन् आन् करीत बन् बन् भटकायला लावून पायांत जोडं न् जिवात जीव न ठिवनारा कायदा ! पोटांतलं पानींबी ढवळु नी मनून तुमाला गुदगुल्याच्या गादीच्या मोटारी आनून देनारा कायदा. कामगार शेतकऱ्यास्नी देशोधडी लावनारा न् तुमच्या बायका पोरास्नी सोन्यामोत्यानीं मढवून काढनारा कायदा. आरं कुनाला बनिवताय त्या कायद्याच्या शिळया बाता मारून अं ? कामगार शेतकऱ्यांची मानगुटं, सुखासुखी तुमच्या जाबाडात घावनार न्हाईत, मनुन तुमच्या भाऊबंदानी इनून तुमच्या हातांत दिलेलं जाळं; मनं कायदा ! ( भकास हंसतो ) आरं न्हाई भुलनार आता कुटला कामगार-शेतकरी तुमच्या थापेबाजीला. तुला ठावं न्हाई मंगू शेट. त्या तुझ्या कायद्याच्या चरखात घावल्यावर, शेतकऱ्याची कवटी कशी गरागरा गरागरा फिरती ती. कशी घुसळन चालती ती. कोर्टाचे खेटे घालतांना, डोक्स्यात घुसळनारे इचार शेतकरी जर...आमलांत आनायला लागला... तर...( भयंकर हंसतो )...पन न्हाई. लै गिळतो त्यो, लै. ( स्वतःला सावरल्यागत ) शेतकरी मंजी मोटा दमाचा, धिराचा गडी. ह्येऽ हल्यासारखा सोसत न्हातो, चाळनी चाळनी करून घेतो देहाची. पन... ( चिडून ) न्हाई; न्हाई जा. जा हितनं चालते व्हा. न्हाईतर पाडीन टिप्पिऱ्या संगं एकेकाला खालीं... ..( पप्पूशेठ, मंगूशेट जातात. )

**अबदुल** : पाटील !

**सुभाना** : ( आपल्याच तंद्रींत ) आं !

**अबदुल** : बोललात बराबर पन......

**सुभाना** : ( तंद्रींतून मोकळं होत ) आं ! !

**अबदुल** : तसं तुमी बोललात बराबर. पन...दादा, अवकाळी अवधान सुटलं तर आपल्या चळवळीला बी चांगलं नसतं.

**सुभाना** : ( थोडंसं सांशक होऊन ) काय मनतोस ?

**धर्मा** : होय दादा, काई एळा असं होनं बरं नसतं खरं.

**सुभाना** : ( न कळून ) असं मंजी कसं ?

**अबदुल** : त्याचं असं हाय पाटील, सरकार-सावकाराला अशाच एळी आपल्यातले चार सा पुढारी धरून न्ह्यायचे असत्यात. झेलात. मंजी म्हागल्या कामगार शेतकऱ्यांला बुचकळ्यांत पाडायचं, फूट पाडायची असती त्यांच्यात.

अशा रितीनं फूट पाडुन लढा चिरडायचा असतो त्यांचा. मंजी आपली मानसं झेल, लाठी, गोळीला भ्येत्यात असं न्हाई माझं मननं. पन काय पाटील, दुस्मानाच्या चढाईला थोपून धरून, त्याला तोंड द्यायला, हाय ह्येच्या पक्षी बी नामी एळ मिळाली फाईजी आजच्या आपल्या ताकदीला. चिडायचं, संतापायचं कशाला ? तुम्हीच सांगा. झाडून समदा कारखान्यांतला कामगार, वाडीवाडीतला शेत मजूर; गावागांवातला शेतकरी छाती काढून एका लाइनीत उभा हाय. हाय ह्या ताकतीचा फायदा जास्तीत जास्त आपल्या पदरात पडला फाईजी. काय खरं का न्हाई ? पटलं ?

**सुभाना** : ( विचारपूर्वक ) हं. ( मान हलवीत ) बरं.

( ‘ सुभानराव पाटी ऽ ल, सुभानराव पाटी ऽ ल ’ अशी धोंड्याची हांक येते. धोंड्या आंत येतो. )

**धोंड्या** : अं पाटील, आपलं ऽ सायब आल्याती.

**सुभाना** : कोन सायब ?

**धोंड्या** : हॅं हॅं हॅं आपले जमनसायब, ओरसीर सायब.

**सुभाना** : घेऊन ये आंत. ( ते दोघे येतात. )

**जमनसाहेब** : नमस्ते सुभानराव पाटील. धर्मा पाटील नमस्ते. कशा हाय ?

**सुभाना** : हं बरा हाय. कुनिकडं आला ?

**जमनसाहेब** : अरे काय पाटील. तुम्हीतर नुसती धमाल करून सोडते बाबा. ऑ, अरे काय कारखान्याच्या वॉटर हौस मंदी बी संप करून टाकते ! अरे शेटच्या चालीवर प्यायला बी पानी न्हाय. अं ? अशा कशा बरं ?

**अबदुल** : ऑऽ शेट उपासात हैत न्हवं ?

**धोंड्या** : म त्येस्नी पानी नगं ?

**धर्मा** : न्हाई मंजी मोसंबींन् साकर घेत्यात तवा...

**जमनसाहेब** : अरे काय, माझ्या घरीं, आमच्या मिसेस बाळंत होते, तो त्याला बालुता धुयाला बाय नाय का पानी नाय, हे काय ?

**सुभाना** : म त्याला आमी काय करनार ? कामगारांच्या युनीयनकडं करा अर्ज.

**जमनसाहेब** : हा पाटील. त्येच्याच पायी मेनेजर तुमाला मुलाखतीला बोलावते. तुमी यामंदी लीडर मनून तुमाला मेनीजर बोलवते.

**सुभाना** : ती काय सांगायचंय ती युनीयन्‌कडं सांगा कामगाराच्या, मातर ही सांगताना युनियनच्या मागन्या दिल्याचं पत्तर घेऊन जा न्हाईतर यावं लागंल तितून बी हात हालवीत.

**जमनसाहेब** : अरे पन बाबा मेनीजर सायब काय मनते, ते तो ऐक तर खरा.

**सुभाना** : माजं ती काम न्हाई न मला एळबि न्हाई सायब.

**जमनसाहेब** : ठीक हाय, ठीक हाय पन् हे जी काई तुमी करते ते मुले लोकांचा लै नुकसान होते पाटील. अन् पुना सारे कायदा सोडून...( धोंड्याकडे बघतो. )

**धोंड्या** : ( थोडेंसें धिटाईनें ) व्हय मनं. चाळी वरली सगदी मोटी मोटी न् शिकलेली मानसं मनत्यात कीं हे अन् रुईकर गांवकरी उगंचच दुभत्या काठेवाडी म्हशीला हाकलुन लावाय लागलेत मन...

**धर्मा** : धोंड्या, काठेवाडी म्हैस तर न्हाऊ दे, पन दुधाचा निसता पांढरा रंग तरी दिसतोय कारं डोळ्यापुढं ? गावकऱ्यांच्या डोळयाला तर आंधारी आलीय.

**धोंड्या** : ( आपल्यालाच कळतं अशा दिमाखांत ) हंः उचलली जिभ लावली टाळयाला. मनं आंधारी आलीय-पन् कुनी कुनाला वाळीत टाकायचं न्हाई, भैस्कार घालायचा न्हाई असा कायदा हाय मनं सरकारचा. अन् असा कायदा मोडला मंजी सरकार...

**धर्मा** : ( थोडं चिडून ) एय सरकारच्या-कोन तू मंजी सरकार कारं ?

**धोंड्या** : ( चांचरत ) हां..हां..मी..मी मंजी..सरकारी कायदा...

**धर्मा** : एय कायद्याच्या फायद्या, जा देवीच्या वडाखाली जोगवा मागाया. मोटा आलाय कायदा सांगायला !

**धोंड्या** : धर्मा पाटील, तोंड सांभाळून बोला बरं का !

**जनामावशी** : काय रे ए थोबाडा...कुटं हायस्...अं ?...

**सुभाना** : (चिडून) कायरे ए कुटन्या ? (धोंड्या सरकत सरकत खालीं उतरतो.)

**जमनसाहेब** : काय नाय. काय नाय. धोंड्या, निघ, जाऊ द्या पाटील. त्याचं काय पाटील. येतो आमी. सांगतो सायबाला तुमाला एळ न्हाई मन. काय करते. बरंय; नमस्ते. ( दोघेही जातात. )

**सुभाना :** रामराम ! ( दारापर्यंत जाऊन परत येतो .) हं, तर काय आबा, काय धर्मा.....

**धर्मा :** काई तरी गुताडा हाय.

**अबदुल :** ( विचार करून ) हाय खरा. धर्मा दादा, पडा तुमी भाईर. अन् जाळयाच्या कडंकडंनं जागी ठेवा मानसं. समजलं ?

**धर्मा :** हं समजलं. ( जातो. )

**अबदुल :** नागा, शिदू, तुमी थांबा. अन् पोरानूं चला लागा कामाला जा. ( मुलें जातात. ) नागा; तू वाड्याभाईर बरोबर कानोसा घेत न्हा न् कळवित जा. ( नागा जातो. ) शिदा, तूं मातर धर्मादादाच्या म्हागं म्हागं जाऊन गांव फेरी लावून ये. ( शिदू जातो. ) सुभानदादा, मला पैले दोघं शेट आल्याचं काइ वाटत न्हाई. पन जमन, धोंड्याच्या येन्याम्हागं मातर काइ थोडासा वास येतोय.

**सुभाना :** म मीबी जाऊ मनतोस ?

**अबदुल :** तसं काई न्हाई, हैतं आपले हात चौकडं...पन (विचार करतो) जा. जाच तुमी. मावशीला बरं न्हाई-मी थांबतो हितंच. माझ्या जोडीला तुकारामला तेवढं धाडून द्या अन्...( कानांत सांगतो, सुभान मानेनं होकार देतो. ) दादा, जरा संभाळून जा बरं.

**जनामावशी :** आबा तु जेवला न्हाई बाबा.

**अबदुल :** जाईन न्हाई तर बाई ईलच आता भाकर घेऊन. तुरुत ह्यो जमन बी युनियनकडं गेलाय. त्येचा रिपुर्ट ऐकूनच जेवावं मनतो. तुमी काई घेतलं का न्हाई ?

**जनामावशी :** घेतला न्हवं आताच चा. ( लक्ष्मी अबदुलचें जेवण घेऊन येते. ) बाबा आबा, चल उट घे जेऊन, भुक्याजला आसचील. दे न्हाई दे त्याला पानी. धू तोंड हातपाय. ( न्हाई त्याला पाणी देते व ताट वाढते. अबदुल तोंड हातपाय धुवून येऊन ताटावर बसणार तों नागा येतो. )

**नागा :** भाईर एक मोट्टी मोटर गावाकडं याया लागलीय—माळ उतरायला लागलीय ती.

**अबदुल :** अस्स ! सुभानदादाच्या म्हागं कुनी गेलं ?

**नागा :** नाम्याला धाडलंय.

**अबदुल :** बरं तू जा आपल्या जागीं. नीट न्हा. ( नागा जातो. ) भाबी, आपल्याला बी तयारीनंच न्हायलं फाईजी. ( ताट झाकतो. )

**जनामावशी** : आरं तेवढं जिवून घे आबा. किती वकुत झालाय ?

**अबदुल** : न्हाई मावशी, ऐका तुमी. भाबी, कुटय मगाचा गठ्ठा ? लखूटा ? ( लक्ष्मी ताट झाकून नीट ठेवते. न्हाई थोड्या वेळापूर्वी दिलेलें जाहिरातीचे पुडकें व लखोटा आणून देते. ) भाबी, तुमी न् बाई मिळून पानी करा, अन् ह्यो लखूटा मातर काळजाला लावून ठेवाय फाइजी. ( असें सांगून त्या जाहीराती अंगणांतच जोत्याखाली डाव्या बाजूच्या वींगच्या जवळ जाळीत बसतो. न्हाई, लखोटा चोळींत लपविते व न्हाई-लक्ष्मी एक पातेलें व दोन बादल्या घेऊन मिरची-पाणी तयार करायला लागतं. इतक्यांत न्हाईला मावशी बोलावते व लक्ष्मी पाणी तयार करीत रहाते. )

**जनामावशी** : न्हाईऽ हिकडं ये. ( न्हाई जवळ जाते. ) म्हांगच, परसांचं दार दोनी कडनं कुलूप हाय न्हवं ? आदी हिकडल्या बाजूनं उघडुन ये. अन् मग येळ मिळाला तर म्हागून उघडुन येता ईल; पन् त्येचीबी किल्ली जवळ ठेव. पन् एळ मिळांला न् भाईर पडता आलं तरच......

**न्हाई** : एळ ? ( विचार करून ) मिळंल की...अन् तशीच एळ आली तर मलाबि गेलंच फाइजी न्हवं ? जोखीम हाय...बगू ( न्हाई मागच्या दाराचे कुलूप उघडून त्याच दाराची रस्त्यावरच्या बाजूच्या कुलुपाची किल्ली घेऊन येतं. थोडं तिच्या आधीं तुकारामही येतो. ) आई, ही किल्ली ठेवते माझ्याजवळ.

**जनामावशी** : बरं, बस तुकाराम. ( अबदुल कागद जाळून येतो. )

**अबदुल** : काय तुकाराम ? कुटून आला ? भाईर काई ? गावांत ?

**तुकाराम** : मी तडक घराकुन आलों सांगावा आला तसा. पन तसं काई दिसलं न्हाई इकतं.

**जनामावशी** : मग बाळ जेऊन घे ना रे लवकर, दोन घास; त्याला किती उशीर लागनार ? ( 'बरं' म्हणून आबदुल चुळ भरून जेवायला बसतो. तुकारामच्या जेवणाची चौकशी करतो तो जेवायला लागणार तोंच नागा धावत प्रवेश करतो. )

**नागा** : भाई ! मोटर चावडी पुढं हुबी न्हायलीय. शिपाई न् होमगार्ड हिकडंच याया निघालेत. अन् दोन नवीनच मानसं वाड्याचा वास घेत हिंडाय लागल्याती आधिमधी.

**अबदुल** : (ताटावरून तसाच उठून) व्हय का ? तू जा अन् कुनी हिकडं येताना दिसले रे दिसले की, "ताल्या आबा" मन साद घाल जा मोठ्यानं. जा.

( नागा जातो. ) तयारीनं न्हा समदे. शिपाईन् होमगार्ड हिकडंच येत्यात जनू. काळजीचं काम न्हाई. आपली मानसं येत्यालीच वक्तावर. पन् तंवर जरा एळ काडला फाईजी.

**न्हाई :** व्हय तर, मला बि जायला फाईजी. ही जोखीम हाय की. अन् म्हागचं दार उघडुन मानसं आनायला फाईजी...एळंवर.

**अबदुल :** खरंय. ( विचार करतो. ) हं भाबी. ( तिच्याजवळ कुजबुजतो ) हं पळा. (न्हाई घरांत जाते. मावशी, लक्ष्मी, तुकाराम यांनाही तो सूचना देतो. न्हाई कुंकवाचा करंडा, विस्तव आणून त्यावर ऊद घालते. गळयांत कवड्यांची माळ घालते व केस सोडून कपाळाला कुंकु फासून घेते. एवढ्यात बाहेरून " तात्याबाबा " " तात्याबाबा " अशी नागाची साद येते. न्हाई विस्तवापुढें बसून आंगांत आल्यागत घुमायला लागते. अबदुल, लक्ष्मी, तुकाराम तिच्या भोंवती बसतात. )

**न्हाई :** ( अंगांत आल्यामुळें ) अरे ऽऽ हं हं हं ...

**अबदुल :** बोला आई महाराज, बोला.

( एवढयांत चार होमगार्ड, ड्रेसमध्यें चार साध्या कपडयांतले होमगार्ड, दोन पोलीस एक इन्स्पेक्टरसह सखाराम लंगडतच प्रवेश करतो. पण इथला प्रकार पाहून सगळे स्तंभित होऊन जातात. )

**न्हाई :** अरे...हं...हं...हं...हं...हं अरे ऽ ऽ ऽ हं हं हंऽ

**अबदुल :** बोला म्हाराज, झाडाला तसदी देऊ नका. काय आसंल तें पटपट बोला अन जा आपल्या ठिकानावर. ( इन्पेक्टर सखारामला खुणेनें विचारतो. तो बुचकळयांत पडतो. होमगार्ड शिपायांना पुढें चलण्याविषयीं खुणवतो. )

**न्हाई :** हंऽहं हं हं अरेऽतुला ठावं न्हाई माझा तडाखा. अं.. सत्त्यानास करीन हं...हं...हं...( शिपाई, होमगार्ड जागींच थबकतात. )

**अबदुल :** आई म्हाराज..आमी आपला शब्द फिरिवनार न्हाई आई महाराज; सांगा तरी काय मननं हायती आपलं ?

**न्हाई :** हं हं हं अरे देनार..देनार ? हं. हं.

**अबदुल :** व्हय देऊ आई म्हाराज.

**न्हाई :** अरेऽहं हं हं...माझा नवस फेडला न्हाई...हं हं हं...देनार ? आख्खं बकरं ह्या आमुशाला मिळालं फाईजी. चल बोल. हं हं हं...

**अबदुल :** ( मावशीजवळ जाऊन कुजबुजतो.) कबूल आई म्हाराज कबूल. पन जनामावशीला आराम पडावा; तिचा पोरगा झेलातून सुटावा. अन् तिच्या

म्हागची साडेसाती टळावी. लै हैरान झालाय जीव आई म्हाराज. सोडवन कराच..आमी आमचा शब्द पाळू.

**न्हाई** : अरेऽहं हं हं...अरे बच्चा...माझ्यावर इस्वास न्हाई तुझा ?

**अबदुल** : हाय आई म्हाराज. आसं कसं होईल ?

**न्हाई** : हं हं...मग चल...मला माझ्या जाग्यावर थंड होऊं दे...

(हं...हं...करीत न्हाई उठते व वाड्याबाहेर पडण्यासाठीं घुमत; नाचत निघते. तिच्या मागोमाग लक्ष्मी तुकाराम जातात. अबदुल दारापर्यंत पोंचवून परत येतो. सखाराम आपल्या लोकांसह पायरीवर येतो.)

**सखाराम** : काय जना मावशी, आम्हीं आलों आहोंत.

**जनामावशी** : (काठी टेकीत समोरासमोर उभी रहात) व्हय दिसतय मला ती. पन् ही लटांबर कशाला आनलं ? न्हाईनं चेपलीन् बडवून काढलं एवढं सांगाया इक्ती मानसं लागल्याती रं ?

**सखाराम** : तसं कांहीं नाहीं. पण सरकारी कामांत कांहीं आडव्या डोक्याचे लोक उगीचच सरकारबरोबर—म्हणजे आमच्याबरोबर—उगीचच वितंडवाद घालीत बसतात झालं; काम अगदींच त्रासदायक झालं; तर नाइलाजानं आम्हांला यांची मदत घ्यावी लागते एवढंच.

**जनामावशी** : मंजी तुला लेवी फाईजे तर ?

**सखाराम** : हं. तुझ्यासाठीं कांही मावशे लेव्हीचा प्रश्नच नाहीं. तुझ्याजवळ जमीनच नाहीं तर लेव्ही तरी कसं मागेल सरकार कायदा सोडून ? सरकार नेहमी कायद्यानं सगळ्या गोष्टी करतं. लॅंड ॲक्विझेशन कायद्याप्रमाणं तुझी जमीन सरकारनं ॲक्वायर करून ती साखर कारखान्याला दिली. अन् तरी तूं त्यांतलं उभं पीक कापून आणलंस...

**जनामावशी** : सखाराम, तू कुनापुढं काय बोलतोयस हें ठावं हाय न्हवं ?

**सखाराम** : मावशी, जिव्हाळ्याचीं नातीं न सरकारी प्रश्न यांची सांगड कायदा सुद्धां घालूं शकत नाहीं. मी तरी काय करूं ?

**जनामावशी** : तू काय करनार ? अन् मला तरी कुटं हाय तुझ्या जिवाळ्याची न् उमाळ्याची गरज ?

**सखाराम** : जनामावशे ! बोलाचालींत हासिल नाहीं. सरकारी कायद्या-प्रमाणं मुकाट्यानं, दुसऱ्याच्या जमूनींतून चोरून आणलेला माल हवालीं कर आमच्या अन् गपचूप चल आमच्या संगं कोपरगावाला.

**जनामावशी** : सरकारी सायबा ! अजून शेत जनाचंच हाय. जनाची जमीन जनाच्या मना इरुध आकुर करनार आजून जलमाला आला न्हाई बरं ! जनानं आपलं शेत पिकिवलं. पीक घरीं आनलं. चोरी; दलाली; कारखानदाराची भडवेगिरी जनाच्या कुळाला ठावं न्हाइ. मी माझ्या जमनीची मालकीन हाय अन् जमिनीच्या मालकाच्या मनाइरुध, जना कुनाची जमीन आकुर करू देत नसते ह्यो कायदाबि माझा तुला ठावं हाय.

**सखाराम** : मावशे, बोलून घे आज. जमीन ॲक्वायरीच्या वेळीं तूं हजर नव्हतीस त्याला आम्ही काय करायचं ? त्या ॲक्वायर जमनीत नांगर, तिपन घातलं तें घातलं बेकायदेशीर. अन् दरोडा घालून पीकही आणलंस. आतां ह्या दरोड्यांतला माल अन तूं सरकारला पाहिजे आहेस. नीट ऐक, गोडी गुलाबीनं हें सगळं ताबडतोब झालं पाहिजे. पाहिजे तर तुझा कायदा मामलेदार साहेबांना सांग समजून, चल.

**जनामावशी** : मनं मामलेदारसायब ! माझ्या जमनीत, म्या राबून काढलं पीक, म्या आनलं कापून अन मी चोर ! सखाराम, बंदुकीच्या सावली खालचा संभाइतपना मला कळत न्हाई असं समजू नगंस !

**सखाराम** : मावशे, माझा संभावितपणा काढूं नकोस. मर्यादा सोडूं नकोस.

**जनामावशी** : अं कारं ? जनामावशीचं बोलनं आज इतकं झोंबाय लागलं रं तुला ? अं ? ह्या जनाची मर्यादा काढू नगस. जनामावशी वागाची आई हाय.

**सखाराम** : ( तुच्छतेनं ) हंः बरं बरं. हो बाजूला—नाहीं तर...

**जनामावशी** : नाहींतर ! घरांत घुसणाऱ्याला वाड्याच्या भाईर पडता येनार न्हाई. पुना सांगते, ज्या वागाच्या भीतीनं तुझं सरकारबि चळाचळा कापते त्याची जाळी हाय ही बरं !

**सखाराम** : ( आनंदानें ) म्हणजे बातमी खरी ! चंदा आहे तर आंत ? ( पोलीस होमगार्डांना उद्देशून ) चला, घुसा—व्हा पुढं. (पोलीस होमगार्ड आंत घुसण्याचा प्रयत्न करतात त्याचवेळीं अबदुल तिथली बादली चटकन् घेऊन घुसणाऱ्याच्या तोंडावर त्यांतले पाणी फेकतो. लोक डोळे चोळीत आंत घुसण्याचा प्रयत्न करतात. अबदुल, मावशी प्रतिकार करतात. येवढ्यांत घराच्या मागच्या दारांतून न्हाई, लक्ष्मी, सावित्रा ५-७ जणी काठ्या वगैरे घेऊन येतात. आंत घुसणाऱ्याला विरोध करतात. पोलीस होमगार्ड लाठी सुरू करतात. मावशी दोन तीन काठीचे तडाखे समोर उभा असणाऱ्या सखारामला हाणते. त्यांत एक त्याच्या लंगड्या पायावर लागतो. तो ' आई ' म्हणून ओरडून मावशीच्या

हातांतली काठी झेप घालून हिस्कून घेतो. गर्दीत तीच काठी सखाराम जनामावशीवर दोनदां चालवतो. जनामावशी कोसळते. इतक्यांत धोंडया मुख्य दाराकडून धावत येऊन " लोक आले " " लोक आले " ओरडत येतो. तोंच इन्स्पेक्टर "मोटारीकडे" " वाडयाबाहेर " असा हुकूम सोडतो. धोंडया त्यांच्यांत मिसळतो. सगळे वाडयाबाहेर पडण्यासाठीं पळूं लागतात. इन्स्पेक्टर हातांत पिस्तुल घेऊन त्यांतून निघालेला असतो. म्हाई, आबदुल, लक्ष्मी हातांत लागेल तें घेऊन त्याचा पिच्छा पुरवितात. तुकडी बाहेर गेल्याबरोबर पिस्तुल, बंदुकीचे दोनतीन बार होतात. एवढ्यांत नागा येऊन मावशीला पाहून जातो. बाहेर मारामारीचा आरडाओरडा, धामधूम चाललेली ऐकूं येते. हळूहळू आवाज कमी होत जातो. थोडया वेळांतच म्हाई, लक्ष्मी परत येऊन पहातात तों जना मावशी रक्ताच्या थारोळ्यांत पडलेली असते. म्हाई हंबरडा फोडते. )

**लक्ष्मी :** भाबी, नीट हाथुरनावर ठेवू या त्येस्नी.

**सुभाना :**( वेषांतरीत चंदा, धर्मा, अबदुल वगैरे सकट आंत येतो. ) त्यांनी मोटर मोठ्या खुबीनीं हुबी करून ठिवली होती वो...( चंदाचं लक्ष मावशीकडं जातं. धांवतच तो मावशीवर झेप टाकतो, म्हाई पाणी आणते. सुभाना, चंदा धर्मा, अबदुल हे मावशीला नीट अंथरुणांत आणून ठेवतात. चंदा नाडी बघतो. आबदुल तिला वारा घालतो. चंदा तिच्या तोंडांत पाणी घालतो. क्षणभरानें मावशीची हालचाल सुरू होते. चंदा मावशीच्या कानांजवळ " आई " " आई " म्हणून हांक मारतो. त्याच्या हांकेनं म्हाई, सुभाना दचकतात, सुभाना त्याच्याकडे निरखून पहातो. चंदा त्याला हातानं गप्प रहाण्याविषयीं सांगतो. चंदा तिसऱ्यांदा " आई " म्हणून आर्त हांक मारून, तिचं डोकं आपल्या मांडीवर घेतो, मावशी कण्हत ' चंदा ' म्हणून हाक मारते. )

**चंदा :** आईऽआऽई, मी तुझा चंदा. ह्यो बघ, बघ ना आईऽ

**जनामावशी :** चंदा ! ( डोळे किलकिले करून ) कुठंय माझा...चंदा ?

**चंदा :** आई, मीच तुझा चंदा.

**जनामावशी :** तुम्हीं ? ( आश्चर्यानं ) तूं...तूं...हाक माझ्या चंदाचीच... पन...तूं...तूं.

**चंदा :** होय आई, अशा ह्या दिवसांत तुझा चंदा पहिला कसा दिसणार ? तुझ्या चंदानं खूप बदल केला आई.

**जनामावशी :** ( त्याला निरखून पहात सद्गतीतपणें ) होय माझा चंदाच ! ...पन..कायरं ही तुझी दशा ?..म.. आजवर ओळख दिली नाहीस...राजा... पानी..पानी...

**जनामावशी** : सरकारी सायबा ! अजून शेत जनाचंच हाय. जनाची जमीन जनाच्या मना इरुध आकुर करनार आजून जलमाला आला न्हाई बरं ! जनानं आपलं शेत पिकिवलं. पीक घरीं आनलं. चोरी; दलाली; कारखानदाराची भडवेगिरी जनाच्या कुळाला ठावं न्हाइ. मी माझ्या जमनीची मालकीन हाय अन् जमिनीच्या मालकाच्या मनाइरुध, जना कुनाची जमीन आकुर करू देत नसते ह्यो कायदाबि माझा तुला ठावं हाय.

**सखाराम** : मावशे, बोलून घे आज. जमीन ॲक्कायरीच्या वेळीं तूं हजर नव्हतीस त्याला आम्ही काय करायचं ? त्या ॲक्वायर जमनीत नांगर, तिपन घातलं तें घातलं बेकायदेशीर. अन् दरोडा घालून पीकही आणलंस. आतां ह्या दरोड्यांतला माल अन तूं सरकारला पाहिजे आहेस. नीट ऐक, गोडी गुलाबीनं हें सगळं ताबडतोब झालं पाहिजे. पाहिजे तर तुझा कायदा मामलेदार साहेबांना सांग समजून, चल.

**जनामावशी** : मनं मामलेदारसायब ! माझ्या जमनीत, म्या राबून काढलं पीक, म्या आनलं कापून अन मी चोर ! सखाराम, बंदुकीच्या सावली खालचा संभाईतपना मला कळत न्हाई असं समजू नगंस !

**सखाराम** : मावशे, माझा संभावितपणा काढूं नकोस. मर्यादा सोडूं नकोस.

**जनामावशी** : अं कारं ? जनामावशीचं बोलनं आज इतकं झोंबाय लागलं रं तुला ? अं ? ह्या जनाची मर्यादा काढू नगस. जनामावशी वागाची आई हाय.

**सखाराम** : ( तुच्छतेनं ) हंः बरं बरं. हो बाजूला—नाहीं तर...

**जनामावशी** : नाहींतर ! घरांत घुसणाऱ्याला वाड्याच्या भाईर पडता येनार न्हाई. पुना सांगते, ज्या वागाच्या भीतीनं तुझं सरकारबि चळाचळा कापते त्याची जाळी हाय ही बरं !

**सखाराम** : ( आनंदानें ) म्हणजे बातमी खरी ! चंदा आहे तर आंत ? ( पोलीस होमगार्डांना उद्देशून ) चला, घुसा—व्हा पुढं. (पोलीस होमगार्ड आंत घुसण्याचा प्रयत्न करतात त्याचवेळीं अबदुल तिथली बादली चटकन् घेऊन घुसणाऱ्याच्या तोंडावर त्यांतले पाणी फेकतो. लोक डोळे चोळीत आंत घुसण्याचा प्रयत्न करतात. अबदुल, मावशी प्रतिकार करतात. येवढ्यांत घराच्या मागच्या दारांतून न्हाई, लक्ष्मी, सावित्रा ५-७ जणी काठ्या वगैरे घेऊन येतात. आंत घुसणाऱ्याला विरोध करतात. पोलीस होमगार्ड लाठी सुरू करतात. मावशी दोन तीन काठीचे तडाखे समोर उभा असणाऱ्या सखारामला हाणते. त्यांत एक त्याच्या लंगड्या पायावर लागतो. तो 'आई' म्हणून ओरडून मावशीच्या

हातांतली काठी झेंप घालून हिस्कून घेतो. गर्दींत तीच काठी सखाराम जनामावशीवर दोनदां चालवतो. जनामावशी कोसळते. इतक्यांत धोंडया मुख्य दाराकडून धावत येऊन " लोक आले " " लोक आले " ओरडत येतो. तोंच इन्स्पेक्टर "मोटारीकडे" " वाडयाबाहेर " असा हुकूम सोडतो. धोंडया त्यांच्यांत मिपळतो. सगळे वाडयाबाहेर पडण्यासाठीं पळूं लागतात. इन्स्पेक्टर हातांत पिस्तुल घेऊन त्यांतून निघालेला असतो. ऱ्हाई, आबदुल, लक्ष्मी हातांत लागेल तें घेऊन त्यांचा पिच्छा पुरवितात. तुकडी बाहेर गेल्याबरोबर पिस्तुल, बंदुकीचे दोनतीन बार होतात. एवढ्यांत नागा येऊन मावशीला पाहून जातो. बाहेर मारामारीचा आरडाओरडा, धामधूम चाललेली ऐकूं येते. हळूहळू आवाज कमी होत जातो. थोडया वेळांतच ऱ्हाई, लक्ष्मी परत येऊन पहातात तों जना मावशी रक्ताच्या थारोळ्यांत पडलेली असते. ऱ्हाई हंबरडा फोडते. )

**लक्ष्मी :** भाबी, नीट हाथुरनावर ठेवू या त्येस्नी.

**सुभाना :**( वेषांतरीत चंदा, धर्मा, अबदुल वगैरे सकट आंत येतो. ) त्यांनीं मोटर मोठ्या खुबीनीं हुबी करून ठिवली होती वो...( चंदाचं लक्ष मावशीकडं जातं. धांवतच तो मावशीवर झेप टाकतो, ऱ्हाई पाणी आणते. सुभाना, चंदा धर्मा, अबदुल हे मावशीला नीट अंथरुणांत आणून ठेवतात. चंदा नाडी बघतो. आबदुल तिला वारा घालतो. चंदा तिच्या तोंडांत पाणी घालतो. क्षणभरानें मावशीची हालचाल सुरू होते. चंदा मावशीच्या कानांजवळ " आई " " आई " म्हणून हांक मारतो. त्याच्या हांकेनं ऱ्हाई, सुभाना दचकतात, सुभाना त्याच्याकडे निरखून पहातो. चंदा त्याला हातानं गप्प रहाण्याविषयीं सांगतो. चंदा तिसऱ्यांदा " आई " म्हणून आर्त हांक मारून, तिचं डोकं आपल्या मांडीवर घेतो, मावशी कण्हत ' चंदा ' म्हणून हाक मारते. )

**चंदा :** आईऽआऽई, मी तुझा चंदा. ह्यो बघ, बघ ना आईऽ

**जनामावशी :** चंदा ! ( डोळे किलकिले करून ) कुठंय माझा...चंदा ?

**चंदा :** आई, मीच तुझा चंदा.

**जनामावशी :** तुम्हीं ? ( आश्चर्यानं ) तूं...तूं...हाक माझ्या चंदाचीच... पन...तूं...तूं.

**चंदा :** होय आई, अशा ह्या दिवसांत तुझा चंदा पहिला कसा दिसणार ? तुझ्या चंदानं खूप बदल केला आई.

**जनामावशी :** ( त्याला निरखून पहात सद्गतीतपणें ) होय माझा चंदाच ! ...पन..कायरं ही तुझी दशा ?..म.. आजवर ओळख दिली नाहीस...राजा... पानी..पानी...

**चंदा** : ( तोंडांत पाणी घालून ) आज तुझी खरी ओळख पटली…आई !

**जनामावशी** : व्हय…न्हाई..आज मला..पन् बरं…मोकळं…मोकळं वाट तंय…जरा पानी…( चंदा पाणी घालतो. हळू हळू गावकरी जमायला लागतात. )

**चंदा** : ( धर्माला उद्देशून ) धर्मादादा, जा डाक्टरला बोलव, दारावर कुनाला तरी ठेव. जा लवकर. ( धर्मा जातो. )

**जनामावशी** : कशाला…राजा…चंदा… ( मूर्छा येते. )

**चंदा** : ( मावशीच्या डोक्यावर पाण्याचा हबका मारीत वारा घालीत, क्षणभरानें ) आईऽआईऽ

**जनामावशी** : चंदा…एका गोळीनं…एक मानुस मेला तर…पन्नास गोळ्यानीं…किती…कितीजण…मरत्याल ?

**चंदा** : आईऽगप्प रहा. असं काय बोलतेस ?

**जनामावशी** : पानी…( पाणी घेतल्यावर ) न्हाई…सांग…सांग तरी खरं.

**चंदा** : आई ! माणूस नाहीं मरणार. माणसाला गोळी घालणारा कुणी दिसलारे दिसला कीं त्याचा हात जिथल्या तिथं रोखायसाठीं हजारों; लाखों माणसांचे हात धांवत येतील. त्याच गोळ्यांची माळ करून त्यांच्याच गळ्यांत घातली जाईल. अन् त्यांत तुझा चंदा आघाडीवर राहील.

**जनामावशी** : ( मोठ्या आशेने ) खरंच…?

**चंदा** : होय आई.

**अबदुल** : होय मावशी.

**जनामावशी** : ( आनंदानें ) हं…आतां पुरं…पुरं मला…बस्…एवढंच …बस…बस…… ( प्राण सोडते. )

**चंदा** : ऑं ऽ आई. ( नाडी पहातो. ) ऑ ऽ गेलीस ? एवढ्याचसाठीं तूं बळी दिलास ! स्वतःचा पहिला बळी दिलास ! आई ऽ आई ऽ

**अबदुल** : ( सांत्वनात्मक ) चंदादादा. दादा.

**सुभाना** : ( मोठ्या धैर्यानं ) न्हाई, चंदा, मावशीनं बळी न्हाई दिला. ( हातांत रक्तानें भरलेला कपडा घेऊन ) ह्यो रक्ताचा ठेवा दिलाय तिनं. समदे शेतकरी जतन करून ठेवत्याल ह्येला. घे आवरतं घे. अन् ह्येच्याच उजेडांत चल पुढं. चल.

— पडदा —